

भास नाटक चक्रातील

# बालचरित

(मराठी अनुवाद)

डॉ. गोविंद केशव भट.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

# बालचरित

( भास लिखीत " बालचरित " या नाटकाचा अनुवाद )

अनुवादक

डॉ. गो. के. भट

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

# निवेदन

प्रा. गो. के. भट हे संस्कृत साहित्याचे मोठे उपासक आहेत. भासाच्या 'बालचरित' या नाटकाचा त्यांनी केलेला अनुवाद प्रसिद्ध करण्यास आम्हाला फार आनंद होत आहे.

४२, यशोधन,
मुंबई-४०० ०२०
दि. ४ डिसेंबर, १९८७.

**सुरेन्द्र बारलिंगे**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संकृती मंडळ

आहे, तशी इथेही वापरली आहे. हे जे थोडेसे स्वातंत्र्य मी घेतो ते मराठीची भाषिक प्रकृती सांभाळण्यासाठी, वाचकाला आपण मराठी वाचतो आहो असा प्रत्यय यावा येवढ्यासाठी. अन्यथा समग्र अनुवाद मुळाप्रमाणेच आहे.

साहित्य संस्कृती मंडळाने हा अनुवाद माझ्याकडे सोपवून संस्कृत आणि मराठी साहित्याची अल्पशी सेवा करण्याची संधी मला दिली त्याबद्दल मंडळाचे अध्यक्ष डॉ. बार्लिगे, भाषांतर विभागाचे मानसेवी संपादक श्री. कुबेर आणि मंडळाचे अन्य पदाधिकारी यांचा मी ऋणी आहे.

अ १२, स्वप्ननगरी
कर्वे पथ
पुणे ४११ ००४.

**गोविंद केशव भट**

# बालचरित

## प्रस्तावना

### १. त्रिवंद्रम नाटके – भाससमस्या

लिखित स्वरूपात ज्यांची नाटके उपलब्ध आहेत अशा संस्कृत नाटककारांतील अग्रगामी नाटककार म्हणजे भास. भासाची लहानमोठी तेरा नाटके हाती लागली ती मात्र विसाव्या शतकाच्या पहिल्या दहा-बारा वर्षांत. तोवर संस्कृत कवींच्या आणि साहित्यशास्त्रकारांच्या तोंडून भासाचे नावच फक्त ऐकू येत होते.

हे नाव मात्र आदराने घेतलेले आहे. कालिदासाने आपल्या 'मालविकाग्निमित्र' या पहिल्याच नाटकात भासाला मानाचा मुजरा केला आहे. सातव्या शतकातला बाणभट्ट 'हर्षचरित' मध्ये, भासाने संस्कृत नाट्यप्रयोगाच्या पद्धतीला नवे वळण लावल्याचा निर्देश करतो. नाटककार, नट, दिग्दर्शक अशा विविध भूमिका घेऊन भासाने नाट्याची सेवा केली; आणि नाट्यस्पर्धांमध्ये विजय संपादून राजाच्या हातून गौरवाची 'पताका' अनेकवार मिळविली (पाहा– G. K. Bhat, Bhāsa Studies, " Bāṇa's Tribute to Bhāsa "). याच शतकातला प्राकृत कवी वाक्पतिराज 'जलणमित्त' (ज्वलनमित्र, अग्नीचा मित्र) या शब्दाने भासाचा गौरव करतो. 'सूक्तिमुक्तावली' रचणारा राजशेखर म्हणतो की 'परीक्षकांनी भासाची नाटके अग्नीत टाकली, तेव्हा 'स्वप्नवासवदत्त' नाटकाला काही अग्नी जाळू शकला नाही.' बाराव्या शतकातला 'प्रसन्नराघव' नाटकाचा कर्ता जयदेव भासाला कविताकामिनीचा 'हास' म्हणून संबोधतो. वामन, अभिनवगुप्त, भोजदेव, शारदातनय, रामचंद्र–गुणचंद्र इत्यादी काव्यशास्त्रावर तात्त्विक विवेचन करणारे लेखक याचप्रमाणे भासाचा आणि त्याच्या 'स्वप्नवासवदत्त' नाटकाचा उल्लेख करतात. याचा अर्थ असा की इ. स. च्या चौदा-पंधराव्या शतकापर्यंत तरी भासाची नाटके तत्कालीनांच्या वाचनात–श्रवणात होती.

त्यानंतर मात्र ही नाटके गडप झाली आणि भासाचे नाव ऐकू येईनासे झाले. ' ज्वलनमित्र ' आणि ' अग्निपरीक्षा ' या संदर्भावरून भासाची नाटके जळून गेली किंवा त्याने ती स्वतःच जाळून टाकली, असा प्रवाद उठला. त्याला एखाद्या दंतकथेसारखे गूढ, रोमांचकारी स्वरूप आले.

पुढे भासाची नाटके प्रकाशात आली ती इ. स. १९०९ ते १९१२ या कालावधीत. दक्षिण भारतातील त्रिवंद्रम येथील पुराण–हस्तलिखित - ग्रंथसंग्रहालयाचे प्रमुख महामहोपाध्याय टी. गणपतिशास्त्री यांना ताडपत्रावर मल्याळी लिपीत लिहिलेल्या काही पोथ्या सापडल्या. अभ्यासान्ती ती दीर्घकाल लुप्त झालेली भासाची नाटके होत, असा त्यांना विश्वास उत्पन्न झाला. या पोथ्यांचे संपादन करून त्यांनी ' त्रिवंद्रम – संस्कृत – माले ' मधून या नाटकांचे क्रमाने प्रकाशन केले.

भासाचे नाटयधन पुन्हा सापडल्याचा आनंद मात्र फार काळ टिकला नाही. गणपतिशास्त्र्यांनी ही नाटके भासाचीच म्हणून हिरीरीने पुरस्कार केला. तर इतर संस्कृततज्ज्ञांनी, विशेषतः दाक्षिणात्य विद्वानांनी, ही नाटके भासाची नसून, भासनाटकांच्या रंगावृत्त्या किंवा कोणा केरळीय नाटककाराच्या नकला होत, असा पुकारा सुरू केला.

## भाससमस्येबाबत आज तीन पक्ष दिसतात :

१) त्रिवंद्रम संस्कृत मालेत प्रकाशित झालेली तेराही नाटके भासाची होत असे मानणारांचा अनुकूल पक्ष.

२) त्रिवंद्रम नाटके भासाची असल्याचा निर्विवाद, असंदिग्ध पुरावा उपलब्ध नसल्याने ती बनावट आहेत, अन्य लेखकाची आहेत, असे मानणारांचा प्रतिकूल पक्ष.

३) वरील दोन्ही मतांतील ग्राह्यांश पाहून, नाटकांच्या निःपक्षपाती अभ्यासावर भर देऊ इच्छिणारा विवेचकांचा तटस्थ पक्ष.

**प्रतिकूल पक्षः** (१) संस्कृत नाटकांच्या सामान्य प्रथेप्रमाणे नाटकाचा आरंभ नांदी–श्लोकाने होतो. सूत्रधारप्रवेशाची सूचना त्यानंतर येते. या त्रिवंद्रम-नाटकांत सूत्रधारप्रवेशाची सूचना प्रथम येते; त्यानंतर श्लोक असतो; तो नांदी-सारखा दिसतो. (२) सूत्रधाराच्या प्रवेशाला ' प्रस्तावना ' असे नाव सामान्यतः असते आणि या प्रस्तावात नाटकाचे आणि नाटककाराचे नाव सांगितलेले असते. त्रिवंद्रम – नाटकांत या आरंभीच्या दृश्याला ' स्थापना ' असे नाव आहे. त्यात

फक्त नाट्यारंभीच्या दृश्याची सूचना असते. नाटकाचे आणि नाटककाराचे नाव मूळीच नसते. वस्तुस्थिती अशी आहे की, संस्कृत कविनाटककारांविषयी फारशी माहिती मिळत नाही. जी थोडी बहुत मिळते ती दंतकथेसारखी, संशयास्पद असल्यामुळे विश्वसनीय वाटत नाही. या नाटकांत नाटककाराचे नावच नसल्यामुळे तर भास-कर्तृत्वाविरुद्ध हे एक मोठेच शस्त्र होऊन बसले आहे. (३) केरळ प्रांतातील ' चाक्यार ' नावाचे धंदेवाईक नट संस्कृत नाटकांचे प्रयोग, त्यांच्या पद्धतीप्रमाणे, आज अनेक वर्षे करीत आलेले आहेत. त्यांच्या संग्रही असलेल्या वाडांमध्ये ही नाटके सापडतात. त्यावरून त्रिवेंद्रम नाटके भासाची नसून चाक्यारांची आहेत, फार तर मूळ भास-नाटकांच्या त्या ' भ्रष्ट नकला ' होत, किंवा प्रयोगार्थ बनविलेल्या ' रंगावृत्त्या ' होत, असे या मंडळींचे म्हणणे आहे. अलीकडे त्रावणकोर विद्यापीठातील डॉ. उन्नी यांनी शोध घेऊन भास नाटकांच्या प्रत्येकी खूप प्रती मिळविल्या आहेत. ' अविमारक ' नाटकाच्या एका हस्तप्रतीत त्यांना ' कात्या (यन) ' असे लेखकाचे नाव आढळले. त्यावरून हे नाटक आणि एकंदरीत सर्वच त्रिवेंद्रम नाटके कोणा केरळीय नाटककाराची असावीत असे त्यांनी प्रतिपादन केले आहे. (४) त्रिवेंद्रम नाटकांत रचनेची म्हणून जी वैशिष्टये दाखविण्यात येतात ती केरळीय मल्याळी नाटकांतही आढळतात, त्यामुळे ती भासाचीच म्हणून म्हणता येणार नाही. (५) नाट्यशास्त्रातील नियमांचे उल्लंघन त्रिवेंद्रम-नाटकांतच आहे असे नाही. काही उत्तरकालीन नाटककारही तसे करतात. (६) भाषाविषयक पुरावा हस्तलिखितांचा काल ठरवायला उपयोगी पडेल, ग्रंथकर्तृत्व नाही. (७) संदर्भ ग्रंथामध्ये आलेली अनेक अवतरणे सध्याच्या त्रिवेंद्रम नाटकांत आढळत नाहीत किंवा त्यांशी जुळत नाहीत. भासाचे ग्रंथकर्तृत्व मानायला ही अडचण आहेच.

**अनुकूल पक्ष :** भास-नाटकांच्या हस्तप्रती केरळाखेरीज अन्यत्र कुठे आजवर आढळून आल्या नाहीत ही या नाटकांविषयी काही मत बनविण्यात येणारी फार मोठी अडचण आहे यात शंकाच नाही. त्यात बहुतेक दाक्षिणात्य पंडितांनी भासाचे ग्रंथकर्तृत्व नाकारून, त्रिवेंद्रम नाटके चाक्यारांची किंवा एखाद्या केरळीय नाटककाराची असण्याचा दावा सतत केल्यामुळे, ही समस्या काहीशी एकतर्फी पण झाली आहे. परंतु काही अभ्यासकांना ही नाटके भासाची असल्याचे वाटते आणि वरील आक्षेपांना त्यांच्यापाशी उत्तरे पण आहेत. (१) मुळातच हे लक्षात घ्यायला पाहिजे की भास हा कालिदास- पूर्वकालीन नाटककार आहे; म्हणजे ही नाटके अभिजात - नाटकांच्या पूर्वकालातील ( Pre - classical ) आहेत. नाट्यलेखनाच्या आणि प्रयोगाच्या ज्या पद्धती अभिजात नाटकांच्या कालात पुढे रूढ झाल्या, त्या या नाटकांत दिसत नसल्यास आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. आणि जर ही वैशिष्ट्ये या नाटकांत एकंदरीत सर्वत्र आढळतात

तर त्यांचा एक स्वतंत्र गट मानणे आणि त्यांचे कर्तृत्व एका लेखकाकडे देणे तर्काला धरून व्हावे. (२) भरताच्या 'पूर्वरंगा'चा बारकाईने अभ्यास केल्यावर असे दिसते की, सूत्रधाराने पूर्वरंग आणि त्यातील त्रिगत, प्ररोचना ही अंगे सादर केल्यावर तो जात असे; मग त्याच्याच सारखा दुसरा नट रंगमंचावर ' स्थापक ' म्हणून येई आणि तो नाटकाची, नाटककाराची ओळख प्रेक्षकांना करून देई. स्थापकाच्या या कार्यावरून या अंगाला ' स्थापना ' नाव पडले होते. नाट्यशास्त्राची परंपरा खंडित झाली; पूर्वरंगाचा संकोच झाला; त्यातील नांदी, कविप्रस्ताव, नाट्यारंभाची सूचना इत्यादी अंगे नाटककारांनी स्वतःकडेच घेतली इत्यादी कारणांमुळे नाट्यप्रस्तावाचे रूप अभिजातकालापासून पार बदलून गेले. पण हा इतिहास लक्षात घेतला, आणि पूर्वरंगाच्या उत्क्रांतिकाळात भासनाटके पडतात हे समजले, म्हणजे अनेक गोष्टींचा उलगडा होतो. बाणाने भासनाटके ' सूत्रधारकृतारम्भ ' असल्याचे म्हटले; कारण पूर्वीची नाटके ' स्थापककृतारम्भ ' होती; ते बदलून भासाने स्थापकाचे कर्तव्य सूत्रधाराकडेच देण्याची प्रथा सुरू केली; पण पूर्वपरंपरेप्रमाणे या प्रस्तावाचे नाव 'स्थापना' राहू दिले. जुन्या पद्धतीप्रमाणे परंपरेची नांदी होती; भासाने स्वतःचे ईशस्तवन म्हणून आणखी श्लोक रचला; हा श्लोक एकतर ' रंगद्वार ' म्हणून म्हणता येईल, किंवा दुसरी, म्हणजे नाटककाराची नांदी म्हणून म्हणता येईल. नाटक आणि नाटककार यांची नावे अगोदरच (स्थापकसूत्रधाराकडून) सांगितलेली असल्यामुळे या प्रस्तावात फक्त नाटककाराचे मंगलाचरण आणि आरंभाच्या दृश्याची सूचना एवढेच लिखित-रूपाने येते. अशा रीतीने भासनाटकांच्या आरंभाचे स्वरूप एकंदरीत प्रयोगपद्धतीशी निगडित आहे. **(पूर्वरंगाच्या सविस्तर विवेचनासाठी माझा 'भरतनाट्यमञ्जरी' हा इंग्रजी ग्रंथ आणि त्याची प्रस्तावना पाहावी.)** (३) ही नाटके चाक्यारांच्या वाडांत आहेत असे म्हणतात. नाटकमंडळीजवळ प्रयोगातल्या नाटकांच्या अशा हस्तप्रती असतातच. परंतु गणपतिशास्त्र्यांना ही नाटके राजवाड्यातील ग्रंथालयात ( Palace library ) सापडली होती, हे दाक्षिणात्य पंडित सांगत नसले तरी इतरांनी कसे विसरावे? (४) हस्तप्रती बनवितांना लेखनिकाने प्रमाद होतात. लेखकाचे नावही चुकीने, ऐकीव माहितीवर लिहिले जाते. कालिदास, भवभूति यांच्या कृतीबद्दल असे लेखनप्रमाद (Scribe's errors) झाल्याचे संशोधकांना, विद्वानांना माहीत आहे. परंतु त्रिवंद्रम नाटकांच्या बाबतीत मात्र दाक्षिणात्य पंडित हा पर्याय सरळ डावलतात. असे का? (५) तीच गोष्ट अवतरणांबाबत. संस्कृत टीकाकार, संग्रहग्रंथकार बहुधा स्वतःच्या स्मरणशक्तीवर, पाठांतरावर, माहितीवर विसंबून निर्देश करतात, अवतरणे देतात, असे दिसून येते. मुद्रित मूळ ग्रंथ उपलब्ध नव्हते, आणि ते पाहून अवतरण घेण्याची पद्धती जुन्या काळी नव्हती. शिवाय, हस्तप्रतीमध्येही अनेक पाठभेद, काही वेळा प्रक्षेप, येत असत. त्यामुळे अशी अवतरणे उपलब्ध प्रतींतील पाठाशी जुळत नसल्याचा अनुभव अनेक वेळा

येतो. असे झाल्यास, ती कृती बनावट, भ्रष्ट नक्कल असे म्हणण्यापेक्षा या अवतरणांबाबतच अनाग्रही वृत्ती ठेवण्याकडे अभ्यासकांचा कल होतो. इतर कवि-नाटककारांबाबत अशी दृष्टी दिसते. भास नाटकांबाबतच मात्र हा ' संशयाचा फायदा ' विरोधी पक्षाने का देऊ नये, याचे राहून राहून आश्चर्य वाटते! (६) केरळीय नाटकांत रचनेच्या आणि तंत्राच्या ज्या काही युक्त्या-प्रयुक्त्या आढळून येतात (उदाहरणार्थ, नांदीश्लोकात श्लिष्ट शब्दांनी पात्रांची नावे, घटनांची गती सुचविण्यासाठी ' निष्क्रम्य प्रविश्य ' ही रंगसूचना, बाहुयुद्ध, शयन, स्वप्न इ. वर्जनीय दृश्ये, नाटक-नाटककाराचे नाव नसणे, वगैरे) त्या बाबतीतही असेच म्हणता येईल. या केरळीय नाटककारांनी, प्रयोगाच्या चिरपरिचयामुळे भास-नाटकांचे अनुकरण केले असण्याचा संभव आहे, या तर्कसंगत पर्यायाचा कोणी विचार करायला नको ? एकंदरीत, या नाटकांचे भास-कर्तृत्व निर्विवाद मानायला बाह्य पुरावा नसला तरी ते नाकारण्याइतका सबळ पुरावा तरी कुठे आहे?

**तटस्थ भूमिका** : निर्विवाद ऐतिहासिक माहितीच्या अभावी, बाह्य पुराव्यावरच बहुतांशी भर देणे धोक्याचे असते. कारण असा पुरावा दुधारी शस्त्रासारखा दोन्ही बाजूंना छेद देऊ शकतो. अनाग्रही दृष्टीने, तटस्थ भूमिकेवर, या नाटकांचा अभ्यास करून अंतर्गत पुरावा काय हाती लागतो ते पाहाणे म्हणूनच आवश्यक वाटते.

या नाटकांची प्रणाली अभिजात नाटकांपेक्षा वेगळी आहे. भरत-नाट्य-शास्त्राच्या प्रभावाखाली वर्ज्यावर्ज्यासंबंधीचे जे संकेत संस्कृत नाट्यलेखनात आणि प्रयोगात रूढ झाले, कालक्रमाने दृढमूल झाले, ते या नाटकचक्रात पाळलेले नाहीत. ही गोष्ट ही नाटके मागे पडायला कारणीभूत झाली असावी. नाट्यशास्त्राचा वाढता दबदबा आणि अभिनवगुप्तासारख्या मातबर साहित्यशास्त्रज्ञाने ' रत्नावली ' सारख्या नाटकाचा केलेला विलक्षण गौरव, या दृष्टीने सूचक म्हटला पाहिजे. शास्त्रपूत संकेतांच्या प्रणालीत भासाची तथाकथित बंडखोरी उपेक्षेला निमित्त झाली असल्यास नवल नाही. रामायण-महाभारतासंबंधीचा पुढील दृष्टिकोण असाच मला महत्त्वाचा वाटतो. एव्हाना कैकेयी, वाली, काही अंशी रावण, दुर्योधन, कर्ण, कंस ही पात्रे ' खलपुरुष ' म्हणून जनमानसात रुजली असावीत. त्यामुळे भासाचे या पात्रांचे स्वभावचित्रण, त्यांच्यातील माणुसकी शोधण्याची त्याची दृष्टी, प्रसंगी दुर्योधन, कर्ण वगैरे पात्रांचे नाटकीय दृष्ट्या उदात्तीकरण, ' पञ्चरात्र ' सारख्या नाटकात तर महाभारतच बदलून टाकण्याइतके त्याने घेतलेले कलेचे स्वातंत्र्य, या गोष्टी बदललेल्या अभिरुचीच्या आणि निराळी मूल्ये मानणाऱ्या सामाजिकांना रुचली नसावीत. भासनाटके विस्मृतीच्या पडद्या-आड जायला हेही कारण असावे. भासनाटकांच्या भरतवाक्यांत ' परचक्रा 'चा, ' सिंहपराक्रमी राजा पृथ्वीचे प्रशासन करो ' अशा प्रार्थनेचा, म्हणजे एकंदरीत

अस्थिर राजवटीचा सूर आहे. प्राचीन इतिहासाशी हे विसंगत नाही. म्हणून असेही वाटते की अस्थिर, अशांत राजकीय परिस्थिती हे पण भासनाटकांच्या हस्तप्रती गडप व्हायला एक कारण झाले असावे. येरव्ही बाणासारख्या उत्तरेतील लेखकांनी भासनाटकांच्या प्रयोगांचा गौरवाने उल्लेख करावा, चौदाव्या-पंधराव्या शतकापर्यंत संस्कृत साहित्यात भासाचे नाव घेतले जावे, आणि नंतर मात्र एकदम विसाव्या शतकातच, फक्त केरळातच, धंदेवाईक नटांच्या संग्रहात आणि राज-वाड्यात भासनाटकांच्या मल्याळी लिपीतल्या पोथ्या सापडाव्यात, या घटनेचा अर्थ कसा लावावा ?

ते कसेही असले तरी साहित्य आणि रचनातंत्र या दृष्टींनी भासनाटकांचा अभ्यास उपकारक व्हावा. प्रत्येक लेखकाचे रचनातंत्र वैशिष्टयपूर्ण असते. त्याचे अनुकरण होऊ शकते. परंतु अशा वेळी अस्सल आणि नक्कल यांतील तफावत समीक्षादृष्टीला समजून यायला कठीण नाही, असे मला वाटते. या भूमिकेवरून ह्या नाटकांचा अभ्यास केल्यावर पुढील गोष्टी दिसून येतात :

(१) कथाविषयाच्या दृष्टीने या तेरा नाटकांचे वेगवेगळे गट पडतात.

| | | |
|---|---|---|
| उदयन – नाटके | : | स्वप्नवासवदत्त; प्रतिज्ञायौगंधरायण |
| आख्यायिका – नाटके | : | अविमारक; चारुदत्त |
| रामायण – नाटके | : | प्रतिमा; अभिषेक |
| महाभारत – नाटके | : | पञ्चरात्र; मध्यमव्यायोग; दूतवाक्य |
| (हरिवंश-सह) | | दूतघटोत्कच; कर्णभार; ऊरुभङग; बालचरित |

एकेका गटातील नाटकांत परस्पर साम्य इतके आढळून येते की एकाच गटातील ही नाटके वेगवेगळ्या लेखकांनी लिहिली आहेत असे मानणे कठीण आहे. प्रश्न आहे तो तेराही नाटकांच्या कर्तृत्वाचा. पण नाट्यरचना, मध्यवर्ती विषयाची निवड, मांडणी, वस्तुसंकलनेमधील युक्त्या - प्रयुक्त्या इत्यादी तांत्रिक बाबीत जें साम्य ( Similarity of technique ) आहे तेही उपेक्षणीय नाही. ' राज्यनाश आणि पुनःप्राप्ति ' हा ह्यांतील अनेक नाटकांचा मध्यवर्ती विषय आहे असे माझे मत आहे. उदयन - नाटके, अविमारक, रामायण नाटके यांत हा विषय दुसऱ्या मध्यवर्ती कल्पनेच्या जोडीने स्पष्ट दिसतो. महाभारत-नाटकांत तर हा विषय मुळातूनच डोकावलेला आहे आणि ' राज्य मागून मिळत नाही, ते स्वतःच्या सामर्थ्याने मिळवावे लागते' अशा आशयाचे उद्‌गार दुर्योधनाने काढलेले आहेत. 'बालचरित' नाटकात श्रीकृष्णाचे बालचरित्र आणि कंसवध या घटनांना प्राधान्य असले तरी उग्रसेनाला राज्यप्राप्ती आणि गोपराज्याची प्रतिष्ठापना या

घोषणेवर नाटकाचा शेवट झालेला आहे. अशी नाटयवस्तू निवडल्यावर नाटय-रचनेच्या सोयीसाठी आधारकथेमध्ये बदल करण्याचे हवे ते स्वातंत्र्य या नाटकात घेतले असल्याचे दिसते. त्याचप्रमाणे नाटयवस्तूचा विकास करताना, बहुतेक वेळा मानसशास्त्रीय दृष्टिकोणाला प्राधान्य देऊन प्रमुख पात्रांच्या मनांतील भावनांचे किंवा विचारांचे द्वंद्व चित्रित करण्याकडे या नाटकांचा कल असतो हेही जाणवते. या परिस्थितीत ह्या नाटकांच्या मागे जे सृजनशील मन कार्यप्रवण असल्याचे वाटते ते एक नसून भिन्न भिन्न आहे असे मानणे साहित्यनिर्मितीच्या प्रक्रियेशी तरी जुळण्यासारखे नाही.

(२) प्रस्तुत नाटकांचा साहित्यिक दर्जा एकसारखा नाही हे खरे. पण म्हणून ती वेगवेगळ्या लेखकांनी लिहिली असावीत असेच मानले पाहिजे का ? साहित्याच्या दृष्टीने हे चूक आहे. कारण कोणत्याही साहित्यिकाच्या सर्व कृती एकाच दर्जाच्या कधीच नसतात; त्यांत डावे-उजवे असतेच; आणि याचे कारण असे की साहित्यिकाच्या सर्जनशक्तीमध्ये उत्क्रांती होत असते, चढ उतार होतात; आणि त्या मानाने त्याच्या कलाकृतींची गुणवत्ता कमी अधिक होत असते. तेव्हा ह्या नाटकांचे साहित्यमूल्ये एकसारखे नसले, त्यांची भाषाशैली बदलल्यासारखी दिसली तर त्यांचे कर्तृत्व वेगवेगळ्या लेखकांकडे देणे एवढाच पर्याय नसून, एकाच लेखकाच्या पण भिन्न भिन्न काळी रचलेल्या त्या कृती असणे अगदी शक्य आहे, हे पण साहित्यदृष्टीने विचारात घेणे आवश्यक आहे त्रिवंद्रम नाटकांची अशी संगती लावता येईल.

(३) ही नाटके बनावट, वाङमयचौर्याच्या सदरात टाकण्यासारखी ( Forgeries ) आहेत असे आता कोणी गंभीरपणे म्हणत नाही. परंतु त्यामुळे नाटकांच्या नकला किंवा रंगावृत्त्या ( Stage-Scripts ) फार तर असल्याचा दावा दाक्षिणात्य पंडित आणि त्यांना मान डोलावणारे इतर भारतीय विद्वान करीत आहेतच. संस्कृत हस्तप्रतींच्या बाबतीत प्रांताप्रांताचे पाठभेद, प्रक्षेप, वाढविलेला-गाळलेला मजकूर इत्यादी प्रकार नेहमीचेच आहेत आणि अभ्यासकांना ते माहीत आहेत. मूळ ' जय ' गाथेचे ' महाभारत ' नाही का झाले ? ' रामायणा' च्याही कितीतरी आवृत्त्या आहेत ! परंतु हस्तप्रतींची अशी अवस्था होत असल्याचे माहीत असूनही, रामायण – महाभारताच्या कर्तृत्वावरच आक्षेप घेऊन हे ग्रंथ बनावट असल्याचे कोणी म्हणत नाही. त्रिवंद्रम नाटकांच्या हस्तप्रती केरळखेरीज अन्यत्र कुठेही उपलब्ध झाल्या नाहीत, त्यामुळे हस्तप्रतींचा तुलनात्मक अभ्यास अशक्य आहे. या परिस्थितीला काही उपायच नाही. परंतु कालिदासापासून अनेक शतके भासाचे नाव जर ऐकू येत आहे तर नाटककार बनावट तरी कसा म्हणावा ? तेव्हा रंगावृत्तीची कल्पना शास्त्रीय

दृष्टीने तपासून पाहिली पाहिजे. काही वेळा असे वाटते की बहुतेक संस्कृत पंडित हे प्रत्यक्ष रंगभूमीपासून दूर आहेत, रंगभूमीसाठी घडणाऱ्या गोष्टींशी त्यांचा परिचय नाही, ते फक्त पुस्तकी ज्ञानाने बोलत आहेत; त्यामुळे वस्तुस्थितीची त्यांना कल्पना नसावी. कारण एखादे मूळ नाटक आणि त्याची प्रयोगासाठी तयार केलेली रंगावृत्ती यांत जो फरक असतो तो असा: प्रयोगाच्या सोयीसाठी, नाट्यानुकूल परिणाम उत्कटतेने साधण्यासाठी, मूळ नाटकातील काही प्रवेश, लांबलचक भाषणे, काही परिच्छेद, वाक्ये, शब्दप्रयोग गाळले जातात. परंतु असे करताना मूळ नाट्यवस्तूला धक्का पोचणार नाही अशी काळजी नेहमी घेतली जाते. मूळ नाटकात काही काटछाट केल्यानंतर कथेचा ओघ आणि संवाद त्रुटित वाटू नये म्हणून काही वाक्ये नव्याने घातली जातात; नव्या रंगसूचना येतात; क्वचित नवी पदे रचून घातली जातात. परंतु असे फेरबदल करताना मूळ नाटकच नव्याने, वेगळे लिहिण्याचा प्रयत्न नसतो. म्हणजे रंगावृत्ती मूळ नाटकाहून तत्त्वतः भिन्न नसते; ती फक्त आटोपसर होते आणि जोडणीचे काही धागे एकसंध परिणामासाठी तिच्यात अधिक आलेले असतात. संक्षेपकार संक्षेप करताना ( abridged version ) मूळ विषयाचा आराखडा कायम ठेवतो; पण त्याची सर्व मांडणी आपल्या दृष्टीने, आपल्या भाषेत नव्याने करू शकतो. नाटकाची रंगावृत्ती अशी होत नाही, हा रंगावृत्ति ( stage adaptation ) आणि संक्षिप्त आवृत्ति ( abridged edition ) यांतील मूलभूत भेद आहे. अशा स्थितीत त्रिवंद्रम नाटके मूळ भासाची नसून त्या रंगावृत्त्या आहेत असे प्रतिपादण्यात रंगभूमीच्या कार्याचे अज्ञानच आपण प्रकट करीत असतो, असे नाइलाजाने म्हणणे भाग आहे.

(४) आणखी एक गोष्ट अशी की रंगावृत्ति तयार करणाराला साहित्यिक दृष्टी असल्यावाचून चालणार नाही. हे काम केवळ नटाचे नव्हे. प्रामाणिक नट नाटककाराच्या कृतीशी मन मानेल तशी झोंबाझोंबी कधी करीत नसतो. उलट, नाटककाराचा अभिप्राय त्याची वाक्ये बरोबर उच्चारून, योग्य अभिनय करून श्रोत्यांना सादर करणे ही आपली जबाबदारी, आपले कर्तव्य होय, असेच नट मानतो. बेजबाबदार नटांची गोष्ट सोडा. तेव्हा चाक्यार नटसंप्रदायाने या रंगावृत्त्या बनविल्या, ही अस्सल नाटके नव्हत, असे म्हणणे हे नटांना आणि रंगभूमीच्या व्यवसायाला सरळ अन्यायाचे आहे.

संस्कृत नाटके सादर करण्याची चाक्यारांची पद्धती मी स्वतः केरळात राहून पाहिली आहे, तेथील मंडळीशी चर्चा केली आहे. त्यावरून मला असे दिसून आले की मूळ नाटकाचे स्वरूप बदलून टाकण्याइतके स्वातंत्र्य चाक्यार घेतात हा भ्रममूलक समज आहे, अनाठायी आहे. संस्कृत नाटकांतून एखादाच अंक

अभिनीत करण्याचे स्वातंत्र्य हा नटवर्ग जरूर घेतो. आणि संवादाची वाक्य उच्चारल्यावर त्यावर मल्याळीमधून टीकाटिप्पणी करण्याची त्यांची पद्धती आहे; यामुळे एकेका अंगाचा प्रयोग कित्येक दिवस / रात्री चालत रहातो. कीर्तनाशी संमिश्र अशी ही नाट्यपद्धती असली तरी मूळ संस्कृत वाक्ये आणि श्लोक जसेच्या तसे सादर करण्याविषयी हे नट जागरूक असतात: छापील पुस्तक हातात ठेवून मी हे ताडून पाहिले आहे.

(५) तेव्हा, ही त्रिवंद्रम नाटके म्हणजे प्रायोगिक संस्कार झालेल्या रंगावृत्त्या, असे समजले तरी त्या मुळाहून सर्वस्वी भिन्न होत असे मानणे चुकीचे होईल; कारण रंगावृत्तीत किरकोळ वाक्ये, रंगसूचना, अधिक पदे वगैरे सोडल्यास जो संवादाचा आलेख असतो तो मूळचाच असतो. शिवाय, या सर्व नाटकांत विषयाची निवड, मांडणी, वस्तुसंकलना करताना योजिलेल्या नाट्यप्रयुक्त्या, म्हणजे एकंदरीत नाट्यतंत्राच्या बाबतीत जे साम्य दिसून येते, जी एकच मानसशास्त्रीय दृष्टि दिसून येते, त्यावरून रंगावृत्त्या देखील एक हातीच झालेल्या असण्याची शक्यता अधिकच वाटते ! अशा रीतीने, एक तर सर्व कृती एकाच लेखकाच्या, प्राय: मूळ पण थोड्या संक्षिप्त स्वरूपात, कदाचित असाव्यात किंवा त्यांच्या रंगावृत्त्या बहुधा कोणी एकानेच तयार केलेल्या असाव्यात, असे पर्याय निष्पन्न होतात.

'स्वप्नवासवदत्त' हे भासाच नाटक होय या विषयी सामान्यत: दुमत नाही. या नाटकांशी इतर नाटकांचे सृजनात्मक दृष्टिकोणाचे आणि रचनातंत्राचे साम्य आहे. तेव्हा, ही नाटके भासाची असावीत असे मानण्याकडे, बाह्य पुरावा नसतानाही, साहजिक कल होतो.

## २. भासाचे व्यक्तिमत्त्व

भासाचे नाट्यकर्तृत्व अव्हरता यणार नाही हे खरे. परंतु त्याच्याविषयी वैयक्तिक माहिती मात्र काहीच उपलब्ध नाही. नाटकचक्रावरून काही तर्क करावयाचे म्हटले तर त्यांचे स्वरूप असे: भासनाटकचक्रात उल्लेखिलेल्या तत्कालीन भारताच्या मर्यादा हिमालय आणि विंध्य आहेत. त्यावरून तो सध्याच्या उत्तर भारताचा रहिवासी असावा. भरतवाक्यातील 'परचक्रा' चा निर्देश अस्थिर राजकीय परिस्थिती सुचवितो.ही परिस्थिती ज्ञात इतिहासाप्रमाणे प्राचीन काळची, बहुधा मौर्य साम्राज्य प्रस्थापित होण्यापूर्वीची असावी. अस्थिर परिस्थिती असूनही भासनाटकांच्या प्रयोगांचा आणि त्याला 'पताका' मिळाल्याचा उल्लेख बाणभट्टाने केला आहे; त्यावरून आणि भरतवाक्यावरून त्याचा एखाद्या राजाशी संबंध आलेला दिसतो. ब्राह्मणांबद्दलची एकंदर आदराची वृत्ती, वेदवेदांगे, विविध शास्त्रे

इत्यादींचे नाटकांतील उल्लेख तो ब्राह्मणकुलातला असावा असे सुचवितात. भासाचे नांदीश्लोक, नाटकांतील प्रत्यक्ष चित्रण, 'दूतवाक्य', 'बालचरित' अशा नाटकांतील श्रीकृष्णाची व्यक्तिरेखा या गोष्टी त्याचा कल कृष्ण-विष्णु-भक्तीकडे असावा असे दर्शवितात. नाटकांतील विदूषक, सूक्ष्म हास्याच्या लकेरी, त्याची विनोदी वृत्ती दाखवितात. पूर्वगामी साहित्याचे स्वतंत्र बुद्धीने वाचन, मानवी मनोव्यापाराची सूक्ष्म समज, नाटचलेखनातील प्रयोगशीलता, लेखनात बंडखोर वाटावी इतकी स्वतंत्र आणि पुढील चाकोरीत न बसणारी त्याची सर्जक प्रतिभा, हे भासाच्या वाङमयीन व्यक्तिमत्त्वाचे गुणविशेष असावेत.

## ३. भासाचा काल

बहुतेक संस्कृत लेखकांच्या प्रमाणेच भासाचा कालही अंदाजाने ठरवावा लागणार आहे. बाणभट्टाने केलेला भासाचा निर्देश पाहाता भासाचा काल इ. स. सातव्या शतकाच्या पलीकडे नेता येणार नाही हे उघड आहे. दुसऱ्या बाजूने, भासनाटकचक्राचे विषय, रामायण-महाभारत ही आर्षकाव्ये, पुराण, दंतकथा, आख्यायिका आणि कदाचित पाली जातककथा ह्यांच्यामधून निवडलेले दिसतात. यांची रचना आणि लोकजीवनात प्रचार इ. स. च्या कित्येक शतके अगोदर झाल्याचे दिसते. या दोन मर्यादांमध्ये भासाचा काल ठरविला पाहिजे.

**बाह्य गमके :** (१) १२ व्या शतकातील 'कुन्दमाला' नाटकात दशरथाच्या प्रतिमेचा उल्लेख आहे. रामायणात तो नसल्यामुळे भासाच्या 'प्रतिमा' नाटकावरून तो आला असावा. (२) ८ व्या शतकातील वामनाने दोन अवतरणे घेतली आहेत; ती 'स्वप्नवासवदत्त' आणि 'चारुदत्त' (१·२; 'मृच्छकटिक' १·९) नाटकांतील श्लोकांशी जुळतात. (३) बाणाने भासाचा गौरव केला आहे. (हर्षचरित १·१५). (४) अश्वघोषाच्या 'बुद्धचरित' काव्यातील 'काष्ठं हि मथ्नन् लभते हुताशं' हा श्लोक 'प्रतिज्ञा' नाटकातील श्लोकाशी (१·१८) मिळता आहे. (५) कालिदासाने 'प्रथितयशसां भास-कविपुत्र ..' अशा शब्दांनी 'मालविकाग्निमित्र' नाटकाच्या प्रस्तावनेत भासाला गौरविले आहे. (६) भासाचे 'चारुदत्त' आणि शूद्रकाचे 'मृच्छकटिक' इतके सारखे आहेत की 'मृच्छकटिक' ही 'चारुदत्ता' ची विस्तारित, पूर्ण-रचना असावी, असेच वाटते. (७) कौटिल्याच्या 'अर्थशास्त्र' या ग्रंथात 'नवं शरावं सलिलैः सुपूर्णं' इ. जे अवतरण आहे ते 'प्रतिज्ञा' (४·२) नाटकात आढळते.

या संदर्भावरून भासाचा काल इ. स. ४ थ्या शतकाच्या पलीकडे असणार नाही, आणि तो कालिदासाच्या अगोदरचा आहे, हे कळते.

**अंतर्गत गमक:** (१) 'प्रतिज्ञा' आणि 'अविमारक' नाटकांत 'काशीराज्या'चा उल्लेख आहे. काशीराज्य इ. स. पूर्व ५ व्या शतकात लोप पावले होते. मगधाची राजधानी म्हणून 'राजगृह' चा उल्लेख आहे; पण इतिहासकाळी तर 'पाटलिपुत्र' राजधानी होती. याच्याच जोडीने 'परचक्र', अस्थिर राजवटीचे सूचन इ. राजकीय गोष्टी मौर्य साम्राज्याचा पूर्वीचा काळ दर्शवितात. हे राजकीय उल्लेख इ. स. पूर्व ४थे – ५वे शतक सुचविणारे आहेत. (२) नाटकचक्रांतील धार्मिक परिस्थिती, ब्राह्मणधर्माबद्दल आदर, कृष्ण हा विष्णूचा अवतार ही कल्पना, नागवन, वेणुवन, राजगृह इ. स्थलनिर्देश, नग्न श्रमणकाचा उल्लेख वगैरे बुद्धकालाच्या जवळचा म्हणजे निदान इ. स. पूर्व ६ व्या शतकाचा काल दर्शवितात. (३) 'प्रतिमा' नाटकातील तापसवेषधारी रावणाने उल्लेखिलेली शास्त्रे आणि मनु, महेश्वर, बृहस्पति, मेधातिथि वगैरे शास्त्रकार प्राचीन आहेत; काही इ. स पूर्व ६ व्या शतकाचे. (४) 'मध्यम–व्यायोग' नाटकात केशवदास ब्राह्मणाचा मधला मुलगा स्वत:चे श्राद्ध स्वत:च करतो; असा श्राद्धविधि बौधायनाने सांगितला आहे आणि बौधायनाचा काल इ. स. पूर्व ७ वे शतक समजतात. बौधायनाच्या ग्रंथात मगध, सिंधु आणि सौवीर ह्या प्रदेशातील लोक वर्णसंकराचे, आर्यावर्ताच्या बाहेरचे, असे वर्णिले आहेत. पण भासनाटकांत तर उदयन मगधराजपुत्री पद्मावती हिच्याशी विवाह करतो; सिंधु–सौवीर राजांचे आप्त कुंतिभोजाला भेट देतात, आणि कुंतिभोजाची कन्या कुरंगी हिचे अविमारकाशी लग्न होते. हे सर्व धार्मिक - सामाजिक निर्देश बौधायनाच्या पूर्वीचा काळ सूचित करणारे आहेत. (५) अविमारकाच्या रात्रिसंचाराच्या वेळी त्याने गुप्त विद्यांच्या आचार्यांची नावे दिली आहेत. 'चारुदत्त' नाटकातील सज्जलकाच्या घरफोडीच्या प्रसंगी पण ही नावे येतात. ही नावे कौटिलीय अर्थशास्त्रातील एतद्विषयक नावांशी जुळणारी आहेत. म्हणजे जादुटोणा, भविष्यकथन, मंत्रविद्या इत्यादी गोष्टींवर समाजाची श्रद्धा होती असे दिसते. ही परिस्थिती पण प्राचीन काळ सुचविणारी आहे. (६) भास–नाटकांतील आर्ष, अपाणिनीय शब्दप्रयोग, बोलभाषेची झाक असलेले संवाद, 'महाब्राह्मण', 'आर्यपुत्र', 'यवनिका' इत्यादी शब्दांचे वेगळेच, अभिजात नाट्यसाहित्यात रूढ झालेल्या अर्थाहून भिन्न असे अर्थ, भरत–नाट्यशास्त्रातील नियमांपेक्षा वेगळी अशी नाट्यरचना, या भाषा आणि नाट्यविषयक गोष्टी असाच फार पूर्वीचा काळ दर्शविणाऱ्या आहेत.

कालिदासाचा काल इ. स. पूर्व पहिले शतक असा मानण्याकडे आता कल आहे. युधिष्ठिर शकाची गणना लक्षात घेतली तर हा काल इ. स. पूर्व सहा - सात शतकांपर्यंत जाईल, एकंदरीत, भास हा इ. स. च्या पूर्वी कित्येक शतके होऊन गेला असावा, असे अनुमान करावे लागणार आहे.

## ४. भास-नाटकाचे साहित्यिक विशेष

(१) भासनाटकचक्रातील नाट्यविषय प्रचलित कथा, आख्यायिका, इतिहास, प्राचीन महाकाव्य अशा आधारसामग्रीतून निवडलेला असतो. मात्र आधार घेऊनही नाट्यवस्तू एखाद्या मध्यवर्ती सूत्राभोवती गुंफण्याचा प्रयत्न भास करताना दिसतो. बऱ्याचश्या नाटकांत 'हरवलेल्या', गमावलेल्या राज्याची पुनःप्राप्ती' हे मध्यवर्ती सूत्र आहे. स्वप्नवासवदत्त, रामायण आणि महाभारत नाटके, कृष्णचरित्रावरील 'बालचरित' ही नाटके या दृष्टीने पाहाण्यासारखी आहेत.

(२) एका सूत्राभोवती नाट्यकथा रचताना मूळ कथेत, एकंदर चौकट कायम ठेवूनही, हवे ते बदल करण्याचे विलक्षण स्वातंत्र्य भास घेतो. 'प्रतिमा' नाटकात परिचित रामायण काही ठिकाणी गुंडाळून ठेविले आहे, तर 'पञ्चरात्र' नाटकात महाभारतच बदलून टाकले आहे.

३) नाट्यकथेच्या मांडणीप्रमाणे दृश्ययोजनाही स्वतंत्रपणे केलेली दिसते आणि ती करताना भरतनाट्यशास्त्राचे वर्ज्यावर्ज्यांचे नियम गैरलागू ठरले आहेत. स्वप्न, निद्रा, द्वंद्व, पात्रांचा रंगमंचावर प्रत्यक्ष मृत्यू, अशी दृश्ये न दाखविण्याचा नाट्यसंकेत भासनाटकांत पाळलेला नाही.

४) नाट्यविषयाची निवड केल्यावर तो फुलविण्यासाठी प्रसंगांची किंवा घटनांची उतरंड रचलेली फारच थोड्या, विशेषतः चरित्रवजा नाटकांत दिसते. भासाचा कल आहे तो पात्रांच्या अंतरंगात शिरून त्यांचा मानसिक संगर चित्रित करण्याकडे. 'स्वप्नवासवदत्त' नाटकाला राजकीय रंग आहे आणि उदयनाचे गेलेले राज्य पुन्हा जिंकून घेणे हे नाट्यातील कारस्थानाचे एक उद्दिष्ट आहे. पण या राजकीय घडामोडी पडद्याआड घडतात. उदयनाच्या आणि वासवदत्तेच्या मनाची आंदोलने भासाने नाटकात दाखविली आहेत, आणि राज्यप्राप्ती झाल्यावरही, राजकारणासाठी दूर ठेवलेल्या वासवदत्तेची उदयनाला पुनःप्राप्ती झाल्याचे दाखविण्यासाठी, शेवटच्या स्वतंत्र अंकाची रचना भासाने केली आहे. 'ऊरुभङ्ग' या एकांकी नाटकात भीम – दुर्योधनांचे गदायुद्ध आरंभीच्या विष्कंभकात केवळ निवेदनाने सांगून, मुख्य दृश्य मात्र दुर्योधनाच्या जीवनाचे करुण पण उदात्त अंतिम क्षण मुखर करण्यासाठी योजिले आहे. 'प्रतिमा' नाटकात कैकेयी आणि भरत यांच्या स्वभावाचे नवे दर्शन आहे. तर 'बालचरित' सारख्या नाटकातही कंसाच्या अंतर्मनाचे द्वंद्व, त्याला पडलेले स्वप्न, शाप, राजश्री आणि भूतशक्ती यांना पात्ररूपाने साकार करून चित्रित केले आहे.

५) अशा कलात्मक चित्रणात स्वप्नाभास, दैवी आयुधांचा व पात्रांचा मानवी रूपाने रंगमंचावर प्रवेश, श्रीकृष्णाचे विश्वरूप दर्शन, अशी विलक्षण दृश्ये भास रंगवून जातो. पात्रनिर्मिती करतानाही प्रचलित कथांत दुष्ट म्हणून रूढ झालेली आणि जनमानसात तशीच रुजलेली पात्रेही भास नव्याने उभी करतो, त्यांना माणसात आणतो. दुर्योधन, कंस, कैकेयी, इत्यादी व्यक्ती भासाच्या दृष्टीने निखालस एकरंगी नाहीत. त्यांच्यातली माणुसकी भास शोधतो आणि ती नाटयामध्ये दाखविण्याचा कलात्मक धीटपणाही प्रत्ययाला आणून देतो.

६) असा माणुसकीचा, मानव्याचा दृष्टिकोण स्वीकारल्यामुळेच संस्कृत नाटयसाहित्यात कधीच निर्माण न झालेली शोकात्मिका (Tragedy) भासाला 'कर्णभार' आणि 'ऊरुभङ्ग' या एकांकी नाटकांत आकाराला आणता आली आहे हे शोकात्म नाटय पाश्चात्य ट्रॅजेडीच्या धर्तीचे आहे.

७) भास - नाटकांत रंगभूमीच्या दृष्टीने एक विलक्षण प्रयोगशीलता जाणवते. रचनाबंधाचा विचार करताना तर एकांकी, तीन अंकी अशा नाटकां- पासून तो नाटक, प्रकरणसदृशबंध, व्यायोग असे अनेक नाटयाचे नमुने इथे आढळतात. प्रायोगिक दृष्टीने पाहाता स्वप्नाचे ('स्वप्नवासदत्त' 'बालचरित') आणि आयुधांचे ('दूतवाक्य' 'बालचरित') मूर्त दर्शन; रंगमंचावर एकाच वेळी दोन संबंधित पण वेगळी दृश्ये ('स्वप्नवासवदत्त; 'चारुदत्त'); कौरव- सभेचे मूक दृश्य आणि एकाच मध्यवर्ती पात्राच्या, दोन-तीन साहाय्यक पात्रांच्या आधारे सर्व नाटयाची उभारणी ('दूतवाक्य'); रंगमंचावर पात्राचा मृत्यू ('प्रतिमा', 'ऊरुभङ्ग', 'बालचरित'); प्राकृताचा उपयोग न करता केवळ संस्कृत भाषेतच संवाद रचलेले नाटय ('दूतवाक्य'); काळोखाची, नदीपार केल्याची, घरफोडीची दृश्ये ('बालचरित' 'अविमारक' 'चारुदत्त'); गोपाळांच्या ग्रामीण जीवनातील हल्लीसक नृत्ये; अशी दृश्ययोजना संस्कृत नाटय- साहित्यात तरी अपूर्व ठरण्यासारखी आहे.

८) काही अपवाद वगळता भासाच्या नाटयसंवादाची भाषा मोजकी, त्रोटक, बोलभाषेच्या लकबींनी रंगलेली, प्राय: अनलंकृत अशी आहे. पद्यरचना करतानाही श्लोकचरण तोडून त्यांना पात्रांच्या संवादाचे रूप देणारा भास हा पहिलाच संस्कृत नाटककार म्हणावा लागेल.

अर्थात भासाचे दोषही आहेत आणि कालिदास किंवा भवभूतिसारख्या नाटककारांचे साहित्यसौंदर्य भासाच्या नाटयशैलीत नाही. पण भासाचे रंग- भूमीचे भान अव्वल दर्जाचे आहे. 'संस्कृत नाटयसृष्टीचा शिल्पकार' असे भासाला यथार्थपणे म्हणता येईल.

# " संभवामि युगे युगे "

## (१)

श्रीकृष्णाच्या बालचरिताने रंगलेल्या या नाटकाची नांदी गाताना सूत्रधाराला युगायुगांतील दैवी अवतारांचे स्मरण होणे साहजिक होते. नांदी संपते तो वरून पुष्पवृष्टी झाली, देवतांच्या दुंदुभि गर्जू लागल्या. वृष्णिकुलात हरी जन्म घेत आहे तो सोहळा पाहायला कलहप्रिय नारदच स्वत: येत होते.

पण ' पुराण पुरुष ' देवकीच्या उदरी जन्म घेत आहेत यातच कलहाचे मूळ होते. नारदाला वेगळी कळ लावण्याची जरुरीच नव्हती. नवजात बालकाला वंदन करून नारद जातात तेवढयात बालकाला घेऊन देवकी समोर येते. बालकाच्या जन्मवेळी महानिमित्ते प्रकटली होती. वसुदेवालाही वाटले की आकाशात प्रचंड वाऱ्याचे झोत फिरून वीज सैरावैरा धावते आहे, नव्या वर्षामेघाच्या गडगडाटानें पृथ्वी हादरते आहे, तर प्रजारक्षणासाठी विष्णूनीच अवतार घेतला असला पाहिजे.

पण देवकीची अगोदरची सहा मुले कंसाने मारून टाकल्यामुळे या सातव्या पुत्रजन्माच्या वेळी शुभशकुन झाले तरी देवकीचे हृदय भयाने भरले आहे. वसुदेवही स्वस्थचित्त नाही. पण त्याने बालकाला कंसापासून कुठे तरी दूर घेऊन जायचे ठरविले आहे. पुत्रवात्सल्याने हृदय उचंबळून आले असताही कंसाच्या हातून बालकाचा मृत्यू झाल्याशिवाय रहाणार नाही, या भयाने देवकीने बालकाला वसुदेवाच्या हाती दिले.

मध्यरात्र. सारी मधुरानगरी झोपेच्या गाढ पाशात अडकून पडली होती. नगरद्वारातून बाहेर पडायला वसुदेवाला मुळीच त्रास झाला नाही. पण भोवती घनदाट काळोख दाटला होता. दिशांचा प्रकाश नष्ट झाला होता. झाडे घनपदार्थासारखी उभी होती. सर्वांगाला अंधाराचा जणू लेप चढत होता. आकाशातून काजळ सांडत होते. दुष्ट माणसाची चाकरी जशी विफल ठरते तशी नजर विफल झाली होती. वसुदेवाची पावले अडखळली.

तेवढयात कुठून तरी मशालींचा प्रकाश आला. आपण सटकल्याचे वृत्त कळून कंस तर पाठलाग करीत आला नाही ना, अशी शंका वसुदेवाच्या मनाला

क्षणभर चाटून गेली: त्याने आपली तलवार चटकन उपसली. पण लगेच कळून आले की रस्ता उजळणारा हा प्रकाश बालकाचा होता. वसुदेव वाटचाल करू लागला.

यमुनेच्या जवळ तो येऊन पोचला. वर्षाजलाने यमुना भरून गली होती. बालकाला सुरक्षित स्थळी गुप्तपणे घेऊन जाण्याचे आपले प्रयत्न निष्फळ होत आहेत हे पाहून वसुदेव खिन्न झाला. पण मनाचा निश्चय करून यमुना पोहून जायचे त्याने ठरविले. पाण्यात शिरताच पाणी द्विधा झाले. इतरत्र पाणी वेगाने उसळी घेऊन वहात होते; तरी वसुदेवाच्या पुढ्यात अचानक उतार पडून पाणी स्थिरावले होते.

नदी पार करून वसुदेव घोषाजवळ आला. या गौळवाड्यात त्याचा मित्र नन्दगोप रहात होता. परंतु कंसाच्या आज्ञेने नन्दगोपालाच्या पायात शृंखला बांधून त्याला चाबकाचे फटकारे मारण्याची शिक्षा देण्याची पाळी वसुदेवावर आली होती. या आठवणीने वसुदेवापासून बालकाला स्वीकारण्याची जबाबदारी नन्दगोप घेईल की नाही ही शंका होती. परंतु दुसरा उपायही नव्हता. अजून रात्र सरली नव्हती. म्हणून पहाट होईपर्यंत एका अंजिराच्या झाडाखाली थांबण्याचे वसुदेवाने ठरविले. मन प्रार्थना करीत होते : गौळवाड्यातून कोणीतरी येवो... कोणीतरी नको, मित्र नन्दगोपच...

आणि प्रार्थना ऐकल्यासारखा नन्दगोपच तिथे आला. तो आला होता मात्र एक दुःखद कर्तव्य पार पाडायला. त्याची पत्नी यशोदा हिने मुलीला जन्म दिला होता. मुलगी जन्मत:च मृत होती. प्रसूतीमुळे यशोदा गुंगून पडली होती; तिची शुद्ध हरपली होती. परंतु दुसऱ्या दिवशी गौळवाड्यात इन्द्रमख नावाचा उत्सव सुरू होणार होता. गोपजनांच्या उत्सवाच्या आनंदावर मृत्यूने विरजण पडले असते. म्हणून मृत बालिकेची व्यवस्था लावायला नन्दगोप रात्रीच गुपचूप आला होता. क्षणभरसुद्धा मुलगी आपल्या घरात खेळलीबागडली नाही, आली ती जाण्याकरिताच, याचे दुःख अनावर होते...

वसुदेवाने नन्दगोपाला ओळखून हाकारा दिला. मध्यरात्रीच्या निर्जन काळोखात ती हाक ऐकून नन्दगोप प्रथम दचकलाच. पण मग आवाजावरून ओळख पटली. वसुदेवाने त्याला विनंती केली : माझे सहा पुत्र कंसाने मारले हे तुला माहीत आहे. हा सातवा तरी जगो. माझ्या नशिबी पुत्र नाही. तुझ्या भाग्यामुळे तरी हा जिवंत राहो !

वसुदेव नन्दगोपाचा स्वामी होता, पण कंसाच्या भयाने बालकाला घेण्याचा धीर नंदाला होईना. वसुदेवाने त्याला आपण केलेल्या उपकारांची आठवण दिली

आणि त्याची परतफेड करण्याचे आवाहन केले. उपकाराच्या भाषेने नन्दगोप विरघळला.

मृत बालिकेच्या स्पर्शाने अशुचि झालेला देह शुद्ध करण्यासाठी नन्दगोपानें खाली वाकून धूळ घेतली. तेवढ्यात तिथे अचानक जलधारा प्रकट झाली. देहशुद्धी केल्यावर बालकाला त्याने आपल्या हाती घेतले.

त्या क्षणी गरुड, चक्र, शार्ङ्ग, कौमोदकी, शङ्ख आणि नन्दक ही श्रीविष्णूचीं वाहने आणि आयुधे प्रकट झाली. त्यांनी बालकाला मनःपूर्वक वंदन केले आणि त्याची साथ करण्यासाठी गोपवेषाने गौळवाड्यात रहायचे ठरविले.

पहाट झाली. नन्दगोप बालकाला घेऊन जसा गौळवाड्याकडे वळला तशी त्याची शृंखला आपोआपच गळून पडली. आश्चर्याने आणि आनंदभराने त्याने वसुदेवाला आश्वासन दिले की हा बालक एका घरी जाऊन दूध पिईल, दुसऱ्या घरी जाऊन दही खाईल, तिसऱ्या घरी लोणी मटकावील, आणखी वेगळ्याच घरी जाऊन पायसावर हात मारील, कुठे ताकाने भरलेल्या घटाकडे पाहात राहील... एकूण आमच्या गौळवाड्याचा हा स्वामी होईल!

निश्चिन्त मनाने वसुदेव मथुरेला परतला. यमुनेने मघासारखीच वाट करून दिली. मथुरा अजून झोपेच्या अधीन होती. कंसाच्या प्रासादावर अवकळा दिसत होती. वसुदेवाच्या निवासावर तेज फाकले होते. नन्दगोपाजवळून आणलेली मृत बालिकाही अगोदरच जिवंत झाली होती. कल्याणाची चिन्हे उमटत होती...

(२)

अंधाराने दाटलेली रात्र. गृहरक्षकांच्या फेऱ्या थांबलेल्या आहेत. दिवलाणी हाती घेऊन मार्ग दाखविणाऱ्या परिचारिकाही कुठे फिरताना दिसत नाहीत. कंस आपल्या महालात, शयनमंदिराजवळ आहे.

एकाएकी काळ्याकभिन्न चण्डालकन्यका महालात प्रकटतात आणि कंसाच्या मागेमागे जात त्याला म्हणतात : आमच्याशी तुझा विवाह होवो! कंस संतापाने त्यांना म्हणतो: चालत्या व्हा! यमाचाही मी यम आहे, भयालाही माझे भय वाटेल. निघा!

चण्डालकन्यका नाहीशा होतात. पण मधूक ऋषीचा वज्रबाहू नामक शाप प्रकट होऊन कंसाला आपली ओळख करून देतो. स्मशानमध्यातून चण्डालवेषाने आलेला शाप कंसाच्या हृदयात शिरू पाहात आहे. पण कावळ्याच्या पंखाच्या

वाऱ्याने मेरु जसा हलणार नाही, ओंजळीने समुद्र पिता येणार नाही, तसे कंसाचे हृदय कोणाच्या अंकित होणारे नाही, असा विश्वास कंसाला आहे. ' वेळ आली म्हणजे कळेल ' एवढेच म्हणून शाप अदृश्य होतो. आणि कंसही बिछान्यावर पडून झोपी जातो.

कंस निद्राधीन झाल्याचे पाहिल्यावर शाप पुन्हा प्रकट होतो आणि अलक्ष्मी, खलती, कालरात्री, महानिद्रा, पिङ्गलाक्षी, या आपल्या संहारक साथीदारांना पाचारण करतो. कंसाच्या अंतर्गृहात शिरून त्याचा ताबा घेण्याचा त्यांचा बेत आहे. पण राजश्री एकदम प्रकट होऊन त्यांना अडविते. राजलक्ष्मीचा निवास जिथे आहे तिथे कोणत्याही विनाशशक्तीला प्रवेश नाही. शाप राजश्रीला समजावून सांगतो की तिने कंसाचे शरीर सोडून जावे अशी श्रीविष्णूची आज्ञा आहे. या आज्ञेपुढे तिचा नाइलाज आहे. राजश्री विष्णूकडे परत जाते. आणि मग शाप आणि त्याचे साथीदार कंसाच्या महालाचा ताबा घेतात. विनाशाकडे नेणाऱ्या खेळाला सुरुवात झाली आहे. ......

प्रतीहारीने येऊन पहाटे जागे केल्यावर कंसाला प्रश्न पडला की मातंग-कन्या राजवाड्यात खरेच आल्या होत्या, का आपल्याला काही स्वप्न पडले ? प्रतीहारीला सांगून कांचुकीयाला त्याने बोलावून घेतले. रात्री वादळ, भूमिकंप, उल्कापात झाले; दैवतप्रतिमा चमकल्या; याचा अर्थ राजज्योतिषी आणि पुरोहित यांना विचारून येण्यास त्याने सांगितले. ज्योतिषी-पुरोहितांनी या अकल्पित घटनांचा अर्थ अगोदरच बसविला होता; नभस्तलनिवासी कोणी देवाने नरलोकात जन्म घेतला होता. त्या जन्माच्या सूचक या घटना होत्या.

कंसाला प्रश्न पडला; कोणाचा हा पुत्र? कशासाठी हा जन्म? ज्योतिषी-पुरोहितांना पुन्हा विचारून कांचुकीयाने सांगितले ; देवकी प्रसूत झाली. मुलगी झाली. एका मुलीच्या जन्माच्या वेळी अशी चिन्हे प्रकट होतील यावर कंसाचा विश्वासच बसेना. पण कांचुकीय खोटे बोलण्याची शक्यता नव्हती. खात्री करून घेण्यासाठी कंसाने वसुदेवाला बोलावणे पाठविले. पुत्ररक्षणासाठी वसुदेवाने खोटे सांगितले की मुलगी झाली.

मुलीला आपल्यासमोर घेऊन येण्याची आज्ञा कंसाने दिली. देवकीने प्रतीहारीमार्फत विनवणी केली की अपत्य बालिका आहे; तिचे प्राण वाचवा. वसुदेवानेही सांगून पाहिले. पण मधूक ऋषीच्या शापाचा परिणाम टाळायचा तर देवकीची अपत्ये ठार केल्याशिवाय गत्यंतर नाही. कंसाने प्रतीहारीबरोबर

देवकीला निरोप पाठविला : आता आग्रह धरू नकोस. तुझे दुसरे काही प्रिय मी करीन. मनात काही आशा धरून देवकीचे सांत्वन करण्यासाठी वसुदेव निघून गेला.

कंसाने मुलीला आपल्यासमोर आणण्याची आज्ञा केली. दाईच्या जवळील बालिकेला पाहून क्षणभर कंसही लोभावला. राजकन्येला साजेसे तिचे रूप होते. आपल्याला स्त्री-हत्या करावी लागते आहे याचाही मनस्वी खेद कंसाला झाला. परंतु ऋषिशापापासून शांती मिळवायची म्हणजे देवकीच्या पोटी जन्मलेली बाळे नाहीशी केल्यावाचून उपाय नव्हता. कंसाने बालिकेला धरून कंसशिळेवर आपटले --- कंसाच्याच लक्षात आले की तिच्या शरीराचा एक अंश जमिनीवर पडला; पण दुसरा अंश वर आकाशात चढला; या अंशाची आकृती भयावह होती. लखलखणारी शस्त्रे घेतलेले अनेक हात; एका हाताने तीक्ष्ण टोकाचा शूल रोखलेला : वेष रौद्र : जणू विनाशाची वेळ घोषित करणारी कालरात्री!

- - - - क्षणार्धात शुंभ-निशुंभ–महिषांचा वध करणारी कात्यायिनी प्रकट होते. जोडीला कुण्डोदर, शङ्कुकर्ण, महानील, मनोजव हेही आहेत कंसवधा–साठीच कात्यायिनीने वसुदेववंशात जन्म घेतला आहे. ती सर्वांना सांगते : श्रीविष्णूचे बालचरित अनुभवण्यासाठी आपण सारे गोपवेष घेऊन गौळवाड्यात जाऊ या! –

पहाट होते. कंसाने विचार केला की गृहशान्ती करविली म्हणजे मनालाही शांती मिळेल – – – मिळावी.

## (३)

नन्दगोपाचे वृंदावन. कृष्णबाळाच्या जन्मागमापासून गौळवाड्यात समृद्धीला पूर आला आहे. जमिनी हिरव्याचार गवतांनी भरल्या. गोधनाचे रोग दूर पळाले. गोड दुधा–तुपाची लयलूट झाली. कंदमुळे आणि फळे जागोजाग आढळून येऊ लागली. गोपजनांचा आनंद आणि परस्पर प्रीती यांना भरते आले.

एका वृद्ध गोपालकाला कृष्णबाळाचे अद्भुत पराक्रम वर्णन करून सांगताना काय काय सांगू असे झाले. बाळ दहा दिवसांचा असतानाच पूतना दानवी नन्द–गोपीचे रूप घेऊन आली आणि बाळाला तिने स्तनाला लावले. बाळाने तिला ओळखले आणि यमसदनाची वाट दाखविली. एक महिन्याचा झाला तो शकट दानवाला एक लाथ हाणून त्याने त्याचे चूर्ण केले. गोपगृहांत बाळाच्या लीला सुरू झाल्या. कुठे जाऊन दूध पी, कुठे दही खा, कुठे लोणी मटकाव, कुठे पायस फस्त कर, तर कुठे ताकाच्या मडक्यावर नजर ठेव! रागावलेल्या गोपींनी तक्रार केली. नन्दगोपीने बाळाच्या कमरेला दोर बांधून त्याला उखळाला बांधून टाकले. बाळाने उखळासकट दोन वृक्षांतून वाट काढली आणि ते वृक्ष, यमल आणि अर्जुन नावाचे

दानव, उन्मळून पडले; त्यांचा चुराडा झाला. सर्व गोपजनांनी बाळाचा हा पराक्रम पाहून त्याला 'दामोदर' नावाने हाक मारायला सुरुवात केली. नंतर प्रलंब नामक दानवाला डोक्यावर मूठ आपटून संकर्षणाने ठार केले; तर तालवनात गर्दभरूपाने आलेल्या धेनुक दानवाचा डावा पाय पकडून दामोदराने त्याला तालवृक्षावर आदळून मारून टाकले. घोड्याचे रूप घेऊन आलेल्या केशी दानवाच्या तोंडात कोपर घालून त्याला उभा चिरून टाकले. दामोदर आणि त्याचा भाऊ संकर्षण यांच्यामुळे वृंदावनाची अद्‌भुत नगरीच झाली होती.

आता दामोदर आणि संकर्षण गोपकन्यकांसमवेत हल्लीसक नृत्य नाचण्यासाठी आले आहेत. केतकीसारखा वर्ण, केसात वन्य फुले माळलेली, रंगीबेरंगी वस्त्रे परिधान केलेली, डोळे फुललेल्या कमळासारखे आणि आनंदाने विस्फारलेले : अशा गोपींच्या समुदायात नीलकांती दामोदर आणि दुग्धवर्णी संकर्षण नृत्यगायनात रमून गेले आहेत. काही गोपी वाद्य वाजवीत आहेत; काही सुस्वर गात आहेत; काही क्रीडारत आहेत. संगीताच्या नादात गाईचा हुम्भारव मिसळून जात आहे. आणि मग समूहनृत्याला रंग चढतो आहे... वृद्ध गोपालकालादेखील या आनंदगीतात सहभागी होऊन नाचावेसे वाटते आहे......

एवढ्यात एक तरुण गोपाल दामक बातमी घेऊन आला की अरिष्ट वृषभ वृंदावनात शिरून कृष्णाच्या रोखाने चाल करून येत आहे. खुरांनी जमीन उकरून काढीत, शिगांनी नदीकाठावरचे ढिगारे उचलून फेकून देत तो प्रचंड वृषभ धावत येत होता. त्याच्या गर्जनेने स्त्रियांचा गर्भपात व्हावा अशी स्थिती होती. त्याच्या गतीच्या दणक्याने पृथ्वी आणि झाडे हादरत होती. सर्व गोपजन भीतीने गांगरून गेले होते.

पण दामोदराचा आत्मविश्वास अभंग होता. आपल्याला पाहून हा बाल घाबरला नाही, चकित झाला नाही, याचा विस्मय अरिष्टाला वाटला. त्यानं दामोदराला युद्धाचे आव्हान दिले. दामोदर एका पायावर उभा राहिला आणि आपल्याला या जागेपासून हलव असे आव्हान त्याने अरिष्टाला दिले. अरिष्टाने धडक दिली; पण तो स्वतःच कोलमडून मूर्च्छित झाला ! अरिष्टाची खात्री झाली की हा साधासुधा बाळ नाही; दानवांचा निःपात करणारा मधुसूदनच असला पाहिजे. पण देवाच्या हातून मरण येण्याहून अधिक चांगले काय असणार ? त्याने पुन्हा धडक मारली. वज्राने अंजनपर्वताचा तुकडा करून टाकावा तसे दामोदराने अरिष्टाला भूमीवर लोळविले.

वृंदावनावरचे संकट या जयामुळे गेले... ... परंतु तेवढ्यात आणखी एक वृत्त कळले : यमुनेच्या डोहातील कालिय नाग उसळून वर आला आहे... ... ... आणि हे समजताच संकर्षणाने तिकडे धाव घेतली आहे ... ...

कालियाची रग कायमची जिरविण्यासाठी दामोदर यमुनेच्या दिशेने निघाला.

(४)

गोपांगनांची अवस्था मात्र दयनीय झाली. दामोदराच्या मागून धावताना त्यांचे केस आणि माळलेली फुले विस्कटून गेली; उत्तरीय खांद्यावरून गळून पडले. दामोदराला आवरण्यासाठी हाक घालताना त्यांच्या स्वरात भय आणि दुःख दाटले.

दामोदराप्रमाणे संकर्षणानेही त्यांना आश्वासन दिले की कालियापासून आपल्याला धोका नाही. उलट दामोदराला येताना पाहून त्या चण्डनागाने शंकित होऊन आपली फणा वाकविली होती. गोपींच्या भयविषादाकडे लक्ष देण्याची ती वेळ नव्हतीच. दामोदराने यमुनेच्या डोहात सरळ उडी घेतली. डोहातून धूर वर उसळला.

गोपींच्याप्रमाणे वृद्धगोपालही भयाकुल झाला होता. पण झाडावर चढून नुसते पाहाण्यापलीकडे तो काहीही करू शकत नव्हता. संकर्षण मात्र बारकाईने निहाळीत होता. दामोदराने तळापासून यमुनाडोह ढवळून काढला आणि नागाला पकडून, मेघखंडावर इंद्र विराजमान व्हावा तसा, त्या नीलभुजंगाच्या फणांवर पाय रोवून उभा राहिला. उरलेले हल्लीसक नृत्य सर्पाच्या मस्तकावरच नाचायला त्याने सुरुवात केली.

क्षणभरात कालियाला बाहेर ओढीत दामोदर सर्वांच्या समोर येऊन उभा राहिला. सर्पाच्या मस्तकावर नाच करताना आणि उड्या मारून डोहाच्या काठावरची फुले तोडताना पाहून गोपांगनांच्या आश्चर्याला सीमा उरली नाही. वृद्ध गोपालकालाही सर्पमस्तकावर नाचण्याची इच्छा झाली; पण भीती वाटून पुढे जाण्याचा धीर त्याला झाला नाही.

कालियाला स्वतःच्या सामर्थ्याचा गर्व होता. कुलपर्वतांसह सर्व पृथ्वी जाळून टाकण्याची शक्ती आपल्या विषाग्नीच्या फूत्कारात आहे, तेव्हा दामोदराला फणांनी घट्ट बांधून स्वर्गात पाठवून द्यायला एक क्षण पुरे, अशी त्याची कल्पना होती. दामोदराने फक्त एक हात पुढे केला आणि तो जाळून दाखव असे आव्हान कालियाला केले. कालियाने विषाग्नी सोडला. त्याचा काहीच परिणाम झाला नाही हे पाहाताच दामोदर म्हणजे साक्षात सुरेश, नारायण, याची त्याला खात्री पटली. तो सर्व परिवारासह दामोदराला शरण आला.

गरुडाच्या भीतीने कालिय यमुनेच्या डोहात दडून बसला होता. दामोदराने त्याला अभय दिले की तुझ्या मस्तकावरील माझे पदचिन्ह पाहून यापुढे गरुड तुला त्रास देणार नाही. सर्पाच्या वास्तव्यामुळे यमुनेचे पाणी विषारी झाले होते. कालियाने विष काढून घेऊन आपल्या अंत:पुरासह दुसरीकडे जाण्याचे मान्य केले.

दामोदराच्या ईश्वरी सामर्थ्याने आता गोब्राह्मणांचे हित झाले. डोहातून खुडलेली फुले दामोदराने सर्व गोपींना वाटून दिली - - - -

तेवढ्यात एका सैनिकाने येऊन निरोप दिला. मथुरानगरीत धनुर्मह नावाचा मोठा उत्सव होणार आहे. त्यासाठी दामोदर आणि संकर्षण या दोघांना परिवारासह कंसराजाने पाचारण केले आहे दामोदराने ओळखले की 'देव-रहस्याचा काल' येऊन ठेपला आहे. कंसाला मारण्याची प्रतिज्ञा करूनच दामोदराने प्रस्थान ठेवले.

दामोदराच्या विपुल विक्रमाची, वीर्यकृत्यांची वार्ता कंसापर्यंत येऊन पोचली होतीच. म्हणूनच त्याने धनुर्मह उत्सवाची आज्ञा देऊन त्या निमित्ताने दामोदराचा घात घडवून आणायची योजना आखली होती.

उतावीळ उत्सुकतेनेच त्याने ध्रुवसेन सैनिकाला नंदगोपाच्या पुत्राच्या आगमनाची बातमी विचारली. ध्रुवसेनाने सांगितले : आपला परिवार आणि संकर्षण यांच्यासह मथुरानगरीत प्रवेश करताच दामोदराने रजकाकडून चांगली वस्त्रे घेतली. हे कळताच महामात्राने उत्पलापीड हत्ती त्याच्या अंगावर सोडला. पण त्या बालाने पर्वतप्राय हत्तीचा दात उपटून त्याला तत्काळ ठार केले.

कंस आश्चर्यचकित झाला. ध्रुवसेनाला त्याने पुन्हा पिटाळले. दुसऱ्यांदा ध्रुवसेनाने येऊन सांगितले : उत्सवाच्या निमित्ताने राजमहापथ ध्वजापताकांनी, माळांनी सुशोभित केला होता. सुगंधी धूप दरवळत होता. राजकुलाच्या द्वारा-जवळ येताच मदनिका नावाची कुब्जा हातात सुगंधी लेपाचे तबक घेऊन उभी असलेली पाहून दामोदराने आपल्या हाताने लेप आपल्या अंगाला लावला आणि तोच हात तिच्या पाठीवर फिरवून तिचे कुबड नाहीसे केले. मग फुलांच्या दुकानांतून हवी ती फुले घेऊन त्याने धनु:शालेकडे मोर्चा वळविला. दामोदराने काय आरंभिले आहे याचाच कंसाला पत्ता लागेना. पुढील घटना जाणण्यासाठी त्याने ध्रुवसेनाला पुन्हा एकदा पाहून यायला सांगितले. आता ध्रुवसेनाने कथन केले : धनु:शालेचा रक्षक सिंहबल याने दामोदराला रोखले. तेव्हा त्याच्या कानावर फटका मारून दामोदराने त्याला ठार केले आणि धनुष्य घेऊन त्याचे दोन तुकडे करून टाकले. आता तो रंग-मंडपाकडे निघाला आहे. मस्तकावर फुलांच्या

माळा आणि मोरपिसे आणि नील अंगकांतीवर खुलणारा पीतांबर ल्यालेला तो बाल दामोदर : रागाने त्याचे विशाल नेत्र गरगरत असल्यामुळे मृत्यूच अवतीर्ण होतो आहे, असे ध्रुवसेनाला वाटले.

कंसाच्या हृदयातही काहूर उठले. रंग-मंडपाचे द्वार उघडायला सांगून मल्लयुद्ध पाहाण्यासाठी कंस प्रासादाच्या सज्ज्यावर चढून आसनस्थित झाला आणि त्याने चाणूर आणि मुष्टिक यांना आपल्यासमोर आणण्याची आज्ञा दिली.

हे मल्ल त्याचा आधार होते. धन्याच्या उपकाराची फेड करण्याची ही संधी आहे असे त्यांना कंसाने बजाविले. दोघा मल्लांनाही खात्री होती की आपल्या लढतीच्या कौशल्याने आपण सहज जय मिळवू.

दामोदर आणि संकर्षण यांनी रंगामध्ये प्रवेश केला. श्यामवर्णी दामोदराची गती गन्धगजासारखी धीर आणि मनोहर होती; त्याचे खांदे आणि बाहू घटलेले होते; छाती रुंद होती. बलराम चंद्रवर्णी, नीलवस्त्र नेसलेला, डोळे कमलासारखे सुंदर, निळ्या कमलांची माळ गळ्यात; बाहू चांदीच्या अडसरासारखे गोल आणि दीर्घ. दोघेही चाणूर-मुष्टिकापुढे बालकच वाटत होते. पण दोघांचाही स्वसामर्थ्यावरचा विश्वास अढळ होता.

शंख–दुंदुभीच्या घोषात मल्लयुद्धाला आरंभ झाला. चाणूर–मुष्टिकांची आव्हाने आणि वल्गना फोल ठरल्या. दामोदराने चाणूराच्या हाडांचा चुराडा केला; संकर्षणाने मुष्टिकाला यमाच्या भेटीला पाठविले. दामोदर लगेच पायऱ्या चढून प्रासादाच्या सज्ज्यात गेला आणि तिथून त्याने कंसाला खाली भिरकावून दिले. कंसाचे हातपाय, गुडघे, खांदे, मान मोडून गेले; तोंड रक्ताने भरून गेले. वज्राने शिखर भग्न झालेला पर्वत कोसळून पडावा तसा कंस रंगामध्ये अस्ताव्यस्त पडला!

एकच हाहाकार उडाला. आणि तो ऐकून प्रमुख वृष्णियोद्धे सैन्यानिशी धावले. त्यांचा समाचार संकर्षणाने घेतला.

तेवढ्यात वसुदेव पुढे आला. त्याने आपल्या दोन्ही पुत्रांची ओळख करून दिली आणि सर्वांना आवरले. दामोदर आणि संकर्षण यांनी वाकून पित्याला अभिवादन केले.

वसुदेवाने आज्ञा देऊन रंगामध्ये पडलेली कलेवरे सैनिकांकडून हलविली, उग्रसेनाला बंधमुक्त करून, अभिषेक करवून समोर आणण्यास सांगितले, आणि वसुदेवपुत्र वासुदेवाच्या प्रसादाने पुनरपि उग्रसेन महाराजांचे शासन सुरू झाल्याची

घोषणा मथुरानिवासी प्रजाजनांना ऐकविली.वृष्णिराज्य प्रस्थापित झाल्याचा आनंद सर्वांना झाला. उग्रसेनाने कृतज्ञभावाने ईश्वरी दामोदराला वंदन केले.

नारद स्वतः अवतीर्ण झाले. पूर्वजन्मी असुर असलेल्या कंसाचा नाश झाल्याबद्दल देवलोकात आनंद पसरला होता, गंधर्व आणि अप्सरा विष्णुस्तुती गात होते. ह्या आनंद व्यक्त करण्यासाठी आणि विष्णुपूजा करण्यासाठी नारद देवांच्या वतीने आले होते.

बालचरित : समीक्षा

## ६ कृष्णावताराचे नाट्यदर्शन

(१)

'भासनाटकचक्रा'मध्ये जी तेरा नाटके समाविष्ट आहेत ती प्राचीन पद्धतीप्रमाणे रामायण, महाभारत, लोककथा किंवा आख्यायिका यांवरच आधारलेली आहेत. परंतु भासाची नेहमीची प्रथा अशी की प्रख्यातचरित नायकाच्या जीवनातील एखादा प्रसंग निवडून, जरूर तर कल्पनेने निर्माण करून, त्याभोवती नाट्य गुंफायचे; आणि नाट्यरचना करताना व्यक्तिमनातील भावनिक प्रतिक्रिया रंगविण्यावर भर द्यायचा. केवळ बाह्य घटनांच्या मांडणीवर सारे नाटक उभे करण्याकडे भासाचा कल फारसा असत नाही. याला अपवाद थोड्याच नाटकांचा आहे. 'अभिषेक' या रामायणावरील नाटकात वालिवधापासून रामाच्या राज्याभिषेकापर्यंतच्या महाकाव्यातील घटना गोवलेल्या आहेत. 'बालचरित' नाटकात कृष्णजन्मापासून कंसवधापर्यंन्तचे कृष्णाचे बालचरित रंगविले आहे. नावाप्रमाणेच हे चरित्रात्मक नाटक आहे.

चरित्रात्मक नाटक रचताना, विशेषतः चरित्रनायकाला दैवी व्यक्तिमत्त्व लाभले असताना, कोणाही नाटककाराचे हात बांधल्यासारखे असतात. त्या व्यक्तीच्या जीवनातील घटना स्थिर झालेल्या असतात, इतिहास, पुराण किंवा परंपरा आणि लोकसमज यांनी त्या घटनांना निश्चित रूप दिलेले असते. त्या घटना डावलणे आणि नवे प्रसंग निर्माण करणे साहित्याच्या दृष्टीने शक्य नसते. घटनाच नव्हेत तर त्यांच्यामुळे व्यक्तिमत्त्वाचे जे विशेष फलित होत असतात त्यांनाही असेच स्थिर स्वरूप आलेले असते. त्यामुळे घटना-प्रसंगांची निवड करणे, त्यांच्या वेगळ्या कार्यकारणभावाचा शोध घेणे, किंवा त्या व्यक्तिमत्त्वाच्या मनाचे अज्ञात कोपरे प्रकाशात आणणे, एवढ्यापुरतेच कलात्मक स्वातंत्र्य लेखकाला घेता येते. नाट्यरचनेच्या दृष्टीने नवीन पात्रांची किंवा काही प्रसंगांची निर्मिती केली

तरी ती चरित्रनायकाच्या एकंदर जीवनाशी सुसंगती साधणारी, कालदृष्टचा संभाव्य वाटणारी अशीच असावी लागते.

(२)

'बालचरिता'ची रचना करताना या मर्यादा भासाला सांभाळाव्या लागल्या आहेतच; आणि हे नाटक वाचताना आपल्यालाही त्या विसरून चालणार नाही. कृष्णाचे बालजीवन अनेक अद्‌भुत गोष्टींनी भरलेले आहे. कारण कृष्ण हा श्रीविष्णूचा अवतार होय ही श्रद्धा फार प्राचीन काळापासून लोकमानसात रुजलेली आहे. या श्रद्धेचा आदर करायचा म्हणजे श्रीकृष्णजीवनावरील नाटकात अद्‌भुताचा अंश फार मोठ्या प्रमाणात येणार हे उघड आहे. भासाने दामोदराला ईश्वरी अवतारच मानलेले आहे आणि विशेष म्हणजे या दैवीपणाची जाणीव स्वतः दामोदरालाही आहे.

नाटकाची सुरुवात नारदाच्या आगमनाने होते. लोकहितार्थ कंसवध घडवून आणण्यासाठी भगवान नारायण वृष्णिकुलात जन्म घेत आहेत, तो सोहळा पाहण्यासाठी आणि मायेने शिशुरूप घेणाऱ्या त्रिलोकेश्वराला अभिवादन करण्यासाठी नारद आले आहेत. दैवी पात्राने दैवी जन्माची केलेली ही घोषणा म्हणजे बालचरिताच्या अद्‌भुत स्वरूपाचा प्रस्तावच होय. प्रत्यक्ष बालजन्माचा जो तपशील देवकी आणि वसुदेव यांच्या भाषणांतून मिळतो तोही कृष्णावताराचे दैवीपण प्रकट करणारा आहे. बालजन्माच्या वेळी अनेक महानिमित्ते प्रकट होतात. प्रचंड वारा, विजेचा कडकडाट, उल्कापात आणि भूकंप ही चिन्हे बालरूपाने विष्णूने अवतार घेतल्याची द्योतक आहेत असे वसुदेवाला वाटते. कंसाचे पुरोहित आणि राजज्योतिषीही सांगतात की स्वर्गनिवासी कोणी देवाने भूतलावर जन्म घेतला आहे त्याची दर्शक ही निमित्ते आहेत.

वसुदेवाने देवकीपुत्राला वृंदावनामध्ये नन्दगोपाच्या हाती सुखरूप पोचविले हा चरित्राचा भाग वर्णितानाही अनेक अद्‌भुत छटा उमटलेल्या आहेत : बाल असूनही कृष्ण मन्दर-पर्वताप्रमाणे जड आहे असे वसुदेवाच्या प्रत्ययाला येते. नन्दगोप जेव्हा बाळाला उचलून घेतो तेव्हा त्यालाही हाच अनुभव येतो. बाल-कृष्णाला घेऊन मथुरा सोडताना सर्व नगरी निद्रेत बुडून गेली आहे, शरिराला लपेटणारा आणि दृष्टी बांधून टाकणारा अंधार सभोवार दाटला आहे; त्यामुळे वसुदेवाचे प्रस्थान फार सुलभ होते. पण या अंधारात पाऊलवाट दाखविणारी तेजोवलयाची प्रभाही चमकते आणि बाळाचा हा प्रभाव आहे अशी वसुदेवाची खात्री होते. यमुनेपाशी येऊन पोचल्यावर दुथडी वहाणारा जलप्रवाह द्विधा होतो आणि वसुदेवाला नदी पार करण्याचा मार्ग सापडतो.

नन्दगोपाच्या हाती बाळाला देताना आणि त्याच्याजवळची मृत बालिका घेताना असेच चमत्कार घडून येतात. या अदलाबदलीच्या क्षणी श्रीविष्णूचे वाहन गरुड आणि चारही आयुधे प्रकट होतात; बालचरित अनुभवण्यासाठी आणि ईश्वरी साथ करण्यासाठी सर्वजण गोपवेषाने वृन्दावनात रहाण्याचा निर्धार करतात आणि हे अद्‌भुत दृश्य नजरेआड होते. बाळाला घेण्यापूर्वी शरीरशुद्धी करावी म्हणून नन्दगोप जमिनीवरची माती उचलतो,तर तेथे अचानक जलधारा प्रकट होते. बाळाला घेतल्यावर नन्दगोपाच्या शृंखला आपोआप गळून पडतात. वसुदेवाने उचललेली मृत बालिकाही एकाएकी जिवंत होते. आणि वसुदेवाच्या परतीचा मार्ग पूर्वीप्रमाणेच सुकर होऊन त्याला बिनबोभाट मथुरेच्या अंतर्गृहात दिवस उजाडायच्या आतच प्रवेश करता येतो•

दुसऱ्या अंकातील कंसाचे स्वप्न, आणि त्याहून वज्रबाहू नामक शाप आणि त्याचे साथीदार यांचा प्रवेश, शापाचे व राजलक्ष्मीचे वाचिक द्वंद्व, लक्ष्मीने राजगृह सोडून जाणे आणि शापाने आपल्या साथीदारासह कंसाच्या शरिराचा आणि मनाचा ताबा घेणे, हा सारा चमत्काराचा आणि अद्‌भुताचाच भाग म्हणावा लागेल. कंस दाईजवळून बालिकेला घेऊन कंसशिलेवर जेव्हा आपटतो तेव्हा आणखी एक अद्‌भुत दृश्य साकार होते. बालिकेच्या शरीराचा एक अंश भूमीवर पडतो पण दुसरा आकाशात चढतो आणि भगवती कात्यायनी आपल्या गणांसह प्रकट होते. कात्यायनीच्या उद्‌गारात कंसकुलाच्या विनाशाची ग्वाही आहे. आणि श्रीविष्णूच्या वाहन-आयुधांप्रमाणेच सर्वजण बालचरित अनुभवण्यासाठी गोपवेषाने गौळीवाड्यात जाऊन रहायचे ठरवितात. नारदाच्या प्रारंभीच्या प्रस्तावाप्रमाणे या दोन्ही दृश्याभासातून कृष्णावताराचे प्रयोजन स्पष्टपणे सांगितलेले आहे.

नन्दगोपाच्या घरी वृंदावनात वाढत असताना बालवयात श्रीकृष्णाने अनेक अद्‌भुत पराक्रम केल्याचे आपल्याला कृष्णचरित्रावरून माहीत आहेच. पूतनेच्या वधापासून तो कंसवधापर्यंतच्या असुर-विनाशाच्या घटना नाटककारानेही निर्देशिल्या आहेत. त्यात बैलाचे रूप घेऊन आलेल्या अरिष्ट नामक दानवाचा नाश आणि यमुनेच्या डोहात सपरिवार रहाणाऱ्या कालियसर्पाचे मर्दन आणि शरणागती या दोन घटना अनुक्रमे तिसऱ्या आणि चवथ्या अंकांत प्रत्यक्ष दृश्यरूपाने दाखविल्या आहेत. दोन्ही प्रसगांत प्रारंभी अरिष्ट आणि कालिय यांची मग्रुरी आणि दामोदराला चिरडून टाकण्याचा निर्धार दिसतो. पण अरिष्ट जोराची धडक मारूनही एका पायावर उभे असलेल्या दामोदराला जागचा हलवू शकत नाही; आणि कालिय विषाग्नीचे फूत्कार सोडून दामोदराचा एक हातदेखील जाळू शकत नाही. कृष्णाच्या हातून अरिष्ट मरतो; कालिय शरणागती पत्करून यमुना सोडून जाण्याचे मान्य करतो. दोघांनाही थोडी झुंज दिल्यावर दामोदर

साक्षात भगवान नारायण आहे याचे ज्ञान होते आणि एका दृष्टीने भगवत्स्पर्शा-मुळे जीवनाची सार्थकता झाल्यासारखे वाटते.

पाचव्या अंकात ज्या घटना आहेत त्यांतही कुब्जेचे शरीर अव्यंग करणे, उत्पलापीड हत्तीचा दात उपटून त्याला ठार करणे, धनु:शालारक्षकाला कानावर फटका मारून गतप्राण करणे, चाणूर-मुष्टिकांशी मल्लयुद्ध खेळून त्यांचा नि:पात करणे, इत्यादी गोष्टींत दैवी चमत्कार किंवा अबालसदृश पराक्रम आणि अद्‌भुत शक्तीचे प्रत्यंतर आहे. प्रत्यक्ष कंसवधानंतर आकाशात दुंदुभि वाजू लागल्या, वरून पुष्पवृष्टी झाली, दामोदररूप श्रीविष्णूची पूजा करण्यास्तव देव एकत्र जमले, गंधर्व आणि अप्सरा यांनी स्तुतिगीते गायिली आणि अभिवादनासाठी नारद पुन्हा अवतरले, असे जे वर्णन आहे ते तर अवतारकृत्याची प्रशंसा म्हणूनच आले आहे. अवतार-जन्माच्या वेळी जसे दैवी वातावरण निर्माण झाले तसे अवतार-कार्याच्या परिपूर्तीच्या वेळीही आहे.

नाटकाच्या चरित्रनायकाला आपण अवतारी पुरुष आहोत याची जाणीव स्वत:लाच आहे. अरिष्ट वृषभाशी किंवा कालिय नागाशी झुंज घेताना याचे प्रत्यंतर येते. स्वत:च्या अमर्याद सामर्थ्याचा आत्मविश्वासच केवळ दामोदराच्या आवाहनात नाही; त्यात दिव्यत्वाची जाणही आहे. धनुर्मह उत्सवासाठी मथुरेहून जेव्हा आमंत्रण येते तेव्हा दामोदर संकर्षणाला म्हणतो : ' आर्य, अयं ननु देव-रहस्यकाल: । ' कंसवध हे बालचरिताचे प्रमुख प्रयोजन होय, याची ही स्पष्ट ग्वाही आहे.

तेव्हा ' बालचरित ' हे आरंभापासून अखेरीपर्यंत दैवी आणि अद्‌भुत रंगांनी उजळलेले आहे यात शंका नाही. संस्कृत लेखकांच्या साहित्यात वीररसाला अद्‌भुताचा रंग अनेक वेळा आलेला दिसतो आणि तो काव्यातिशयोक्ती म्हणून केव्हा केव्हा मानताही येतो. श्रीकृष्णचरित्रात मात्र अद्‌भुताला वीररसाचाही रंग लागावा असे काही तरी झाल्यासारखे वाटते. अर्थात हे अंश मूळ चरित्राचेच असल्यामुळे नाटककारालाही ते डावलता आले नाहीत.

(३)

चरित्रात्मक नाटकात आणखी एक अडचण रचनेच्या दृष्टीने येते नाय-काच्या चरित्राचा जो एक विशिष्ट कालखंड निवडलेला असतो त्या काळात घड-लेल्या महत्त्वाच्या घटना सांगितल्याशिवाय पूर्णता आल्यासारखे वाटत नाही आणि कथनाचा ऐसपैस रचनाबंध नाट्यनिर्मितीत शक्य नसल्यामुळे, एक तर मोजक्या

घटनांवर लक्ष केंद्रित करून अनेक गोष्टी गाळाव्या लागतात किंवा नुसत्या निवेदनाने आणाव्या लागतात. ' बालचरित ' रचताना नाटककाराला या अडचणींना तोंड द्यावे लागले आहेच. पहिल्या अंकात कृष्णजन्माची आणि वृन्दावनात नन्द-गृही त्याला सुरक्षित पोचविण्याची घटना, आणि दुसऱ्या अंकात बदली आणलेल्या बालिकेच्या वधाची घटना दृश्यरूपाने दाखविल्यावर, कृष्णाच्या बालचरितातील अनेक अद्भुत पराक्रम केवळ पुढील तीन अंकात नाटककाराला दाखवावे लागले आहेत. त्यातच तिसऱ्या अंकात अरिष्ट वृषभाचा वध, चवथ्या अंकात कालिय-नागाचे गर्वहरण आणि पाचव्या अंकात चाणूर-मुष्टिकांचा नाश आणि कंसाचा वध हे प्रसंग त्या त्या अंकाचे प्रमुख दृश्य म्हणून रंगविण्याचे ठरविल्यावर उरलेले सारे प्रसंग नुसत्या निवेदनाने मांडावे लागले आहेत. निवेदन किंवा कथन नाटचदृष्टचा फारसे उपयुक्त नसते, परिणामकारक नसते. शिवाय, काही प्रसंग दृश्यरूपात आणि काही केवळ शब्दांनी मांडल्यामुळे नाटचरचनेमध्येही तोल किंवा डौल राहणार नाही, हा धोकाही असतोच.

## (४)

भासाच्या नाटचरचनेत जर एवढचाच गोष्टी असत्या तर ' बालचरित ' नाटकाला फारसे महत्त्व आले नसते: कृष्णचरित्राचे नाटच म्हणून आणि थोडचा भाविकपणाने, जे कौतुक करता आले असते तेवढेच. परंतु भासाने या नाटकाच्या रचनेत काही विशेष गोष्टी केल्या आहेत. कलेच्या दृष्टीने त्या लक्षात घेणे आवश्यक आहेत.

' बालचरित ' वाचताना असे सारखे वाटत रहाते की चरित्रात्मक आणि अदभुताने भरलेल्या नाटकाची मांडणी करताना ज्या अडचणी येतात त्यांची जाण भासाला आहे आणि त्यातून मार्ग काढण्याचा तो सारखा प्रयत्न करीत आहे.

अद्भुताचा भाग नाटचकथेत अपरिहार्य आहे हे पाहिल्यावर भास अद्भुताचा उपयोग कथाविकासाचे दुवे जुळविण्यासाठी न करता, नाटचघटनांना उजाळा देण्यासाठी, त्यांचे बालचरितातील महत्त्व ठसविण्यासाठी, म्हणजे काही विशिष्ट नाटच-परिणाम साधण्यासाठी करीत आहे असे दिसते. नारदासारख्या दैवी पात्राचे आगमन नाटकाच्या सुरुवातीला आणि अखेरीला आहे परंतु नारदाच्या उद्गारांनी कृष्णावतार कंसवधासाठी आहे आणि ते अवतारकार्य कृष्णाने पुरे केले या प्रस्थापित विश्वासाला केवळ दुजोरा मिळाल्यासारखे होते, तो अधिक उत्कट होतो. शिवाय, नाटचकथेचा आरंभ आणि अखेर नारदाच्या प्रवेशाने साधल्यामुळे बालचरितातील घटनांनाही एकसूत्रितपणा येतो आहे तो वेगळाच. सर्व घटनांची मालिका एका धाग्यात गुंफल्यासारखी होऊन सर्व नाटचकथा एकसंध झाल्यासारखी

वाटते. एरव्ही, कृष्णाच्या बाल-लीला आणि अद्‌भुत पराक्रम यांना कृष्णाच्या व्यक्तिमत्त्वाशिवाय एकत्र बांधणारे सूत्र नव्हते. भासाने अवतारकार्याच्या मिषाने ते जणू मिळवून दिले आहे.

कृष्णाला स्वतःला आपण दैवी अवतार घेऊन देवकार्य करायला आलो आहोत अशी जी जाणीव आहे त्यातही संगती आहे. 'अभिषेक' नाटकात राम मनुष्यासारखा वागतो, बोलतो. इतर पात्रांनी आणि दिव्य व्यक्तींनी त्याला आठवण करून दिल्याशिवाय रामाला दिव्यत्वाची जाणीव होत नाही. ही विसंगती विचित्र आहे. 'बालचरित' नाटकात तरी भासाने ती टाळली आहे. कलेच्या दृष्टीने हे अधिक बरे. पात्राने माणसासारखे तरी वागावे किंवा देवासारखे तरी. दोहोंच्या मिश्रणाने येणारी विसंगती पात्रचित्रणाला उपकारक होत नाही. जणू या जाणिवेनेच अद्‌भुताला नैसर्गिक रंगाचा हात देण्याचा प्रयत्न भासाने केलेला नाही.

तरीदेखील केवळ उद्‌भुताचे अकारण भडक वाटणारे रंग सौम्य करण्याचा एक प्रयत्न या नाट्यरचनेत भासाने केला आहे. या प्रयत्नाचे स्वरूप विविध आहे. पहिल्या अंकात श्रीविष्णूचे वाहन गरुड आणि चारही आयुधे यांचे, आणि दुसऱ्या अंकात कात्यायनी आणि तिचे गण यांचे दृश्य आहे. मुळात हा सारा दिव्य आणि अद्‌भुताचा प्रकार. पण दोन्हीमुळे एक उत्कट असा परिणाम घडतो. पहिल्यान दिव्यावताराचा आणि दुसऱ्याने कंसविनाश अटळ असल्याचा विश्वास नाट्यमय रीतीने दृढ होतो. मात्र ही दोन्ही दृश्ये ज्या पद्धतीने साकार होतात त्यात एक विशेष आहे. गरुड, आयुधे, कात्यायनी आणि तिचे गण मानवी आकारात दिसतात. त्यांच्या तोंडी नाटककाराने श्लोक आणि वाक्ये घातली आहेत. म्हणजे ते मानवासारखे बोलतात. फक्त त्यांच्या अवतीर्ण होण्याचे प्रयोजन वेगळे आहे. रंग-मंचावरील नाट्यप्रयोगात नटांनीच ही विविध रूपे घेऊन यायला पाहिजे. योग्य रंगभूषा, वेशभूषा आणि प्रत्येकाचे व्यक्तित्व सूचित करील असे चिह्न धारण केले म्हणजे दृश्य रूपात हा दिव्यत्वाचा भास पूर्णपणे जाणवेल. रचनेच्या दृष्टीने विचार केला तर गूढ किंवा भासमय अशा देवत्व-कल्पनेला इंद्रियगोचर असे रूप देण्याचा हा प्रयत्न आहे. अद्‌भुत जर असे इंद्रियज्ञानाच्या कक्षेत येऊ शकले तर त्याची अनाकलनीयता निश्चितच कमी होण्यासारखी आहे. डोळ्यांनी दिसावे, कानांनी ऐकू यावे, असे जर काही असेल तर ते भासमय न वाटता मूर्त वाटण्या-चाही संभव आहे. या दृश्यीकरणाने काल्पनिक आणि सत्य यांच्या सीमारेषा अशा जवळ आल्यासारख्या वाटतात. भासाच्या सहेतुक रचनेचा हा विशेष समजून घेण्यासारखा आहे.

याचे महत्त्व आणखी एका प्रकाराने लक्षात येते. दुसऱ्या अंकात शाप आणि राजश्री (राजलक्ष्मी) यांचा प्रवेश आहे. या दोन्ही कल्पना प्राचीन परंपरेने परिचित आहेत. त्या काल्पनिक किंवा काहीशा अद्‌भुत, अतिनैसर्गिक वाटल्या तरी ज्या लोकसमजुतींचा त्यांना आधार आहे त्यांत मानवी जीवनाचे एक सत्यही आहे. पूर्वजन्मीच्या दुष्कृत्याचा परिपाक म्हणून किंवा जीवनातील आपत्तीचे, दुर्दैवाचे प्रतीक म्हणून शापाकडे पाहता येते. शापात आगामी अरिष्टाचे सूचन आहे. या दृष्टीने जीवनानुभवाशी शापाचा संबंध जुळतो. राजश्री हे तर मूर्त, बाह्य गोष्टीला कल्पनेने दिलेले अद्‌भुत किंवा दैवी रूप होय असे म्हणता येईल. राजाचे वैभव, समृद्धी आणि सामर्थ्य दृष्टिगोचर आहे. राजलक्ष्मी ही या राजैश्वर्याची देवता, जी कविकल्पनेप्रमाणे सिंहासनाधिष्ठित राजाची पत्नी–प्रेयसी असते. दैवी पात्राप्रमाणे यांनाही नाटककाराने रंगमंचावर आणले आहे. पण शाप आणि राजश्री यांच्यातील अभिप्रेत वास्तवता मनात आणली म्हणजे या पात्रांचा प्रवेश आणि त्यांचे प्रत्यक्ष संभाषण याला सत्य आणि आभास यांचे साहचर्य असेच म्हणावे लागते.

दुसऱ्या अंकातील स्वप्नदृश्यावरून हे अधिक ठळकपणे लक्षात येते. कंसाला स्वप्न पडते. चाण्डालकन्या त्याच्या समोर येऊन आपल्याशी बिवाह कर म्हणून त्याला म्हणतात. हे स्वप्न निवेदनाने न सांगता भासाने त्याला दृश्य रूप दिले आहे. पण स्वप्न ही एक मानसिक घटना आहे आणि मानसशास्त्रदृष्ट्या स्वप्नाला एक निश्चित अर्थही असतो. या मानसिक घटनेला नाटककाराने फक्त मूर्त रूप देऊन बाह्य घटनेचा आकार दिला आहे. यात अस्वाभाविक असे काही नाही. आहे ती केवळ कलात्मक रचना आहे. आणि याच मानसप्रत्यक्ष पण आता आकाराला आलेल्या दृश्याच्या शेजारी शाप आणि त्याचे साथीदार आणि राजश्री यांच्या प्रवेशाचे दृश्य भासाने मांडले आहे. संस्कृत काव्य–नाट्यसाहित्यातील पुढील आणि नेहमीची प्रथा म्हणजे शाप ऋषिमुखाने कळतो; निवेदनाने किंवा शापवाणी ऐकायला येऊन. भासाने मधूक ऋषीचा उल्लेख केला आहेच; पण शापाला वज्रबाहू असे नाव देऊन त्याला मानुष आकारात रंगमंचावर आणले आहे. तीच गोष्ट राजलक्ष्मीच्या बाबतीत. शिवाय, दोघांचा संवाद योजून दुर्दैव आणि सौभाग्य यांच्यातील द्वंद्व साकार केले आहे आणि त्यातून पुढील अनर्थाची सूचनाही दिली आहे. कंस निद्रिस्त असताना शाप आणि राजश्री यांचा प्रवेश घडतो. त्यामुळे या दृश्याला एका वेगळ्या सृष्टीची पातळी आल्यासारखे वाटते यात शंका नाही. पण जागृत किंवा निद्रिस्त मनाची पातळी आणि ही अतिनैसर्गिक वाटणारी पातळी, दोन्ही एकमेकांच्या जवळ आहेत, हेही दिसल्याशिवाय रहात नाही.

नैसर्गिक आणि अतिनैसर्गिक शेजारीशेजारी मांडून कथेच्या आशयाला बोलका सूचकपणा उठावदारपणे यावा असा प्रयत्न इतर अंकातही केलेला दिसतो.

तिसऱ्या आणि चवथ्या अंकात अरिष्ट आणि कालिय यांच्याशी दामोदराचे द्वंद्व प्रत्यक्ष दृश्य घटनांच्या रूपाने दाखविले आहे. दोहोंचे मूळ अद्भुत किंवा अति-नैसर्गिक रंग रचनेत कायम आहेत. तरीही वृषभाला आणि सर्पाला मानवी आकारात रंगमंचावर आणून, त्यांच्या तोंडी मानवसुलभ अशी भाषणे घालून द्वंद्वाच्या प्रसंगाला एक वास्तव छटा देण्याचा रचनात्मक प्रयत्नदेखील आहे. दोघांच्या तोंडची आह्वानाची, दर्पाची भाषा पाहिली म्हणजे पक्ष-प्रतिपक्षाच्या झगड्याची आठवण व्हावी, एखादा वीरोचित प्रसंग पाहावा, असे घडल्यासारखे वाटते.

याहून अधिक महत्त्वाची आणि परिणामकारक गोष्ट म्हणजे नाट्यकथेला गौळवाड्याच्या वास्तव जीवनाची दिलेली पार्श्वभूमी. कृष्णाचा अवतारी जन्म, बालकांची अदलाबदल आणि मृत बालिका एकाएकी जिवंत होणे इत्यादी पहिल्या अंकातील प्रसंग अद्भुताने भरलेले आहेत. मात्र या अद्भुताच्या शेजारीच वसुदेव आणि विशेषत: देवकी यांच्या अपत्यवत्सल भावना, नन्दगोपाचे खरेखुरे दु:ख, गौळवाड्यातील उत्सवाला आपल्या घरच्या मृत बालिकेच्या प्रसंगामुळे शोकाचे आणि निरुत्साहाचे गालबोट लागू नये म्हणून नन्दगोपाला वाटणारी काळजी, कंसाबद्दल त्याच्या मनात असणारी भीती, हे मनोभाव अत्यंत मानवी आणि प्रामाणिक आहेत. ते असे हृदयाला भिडणारे आहेत की अद्भुताचा क्षणभर विसरच पडावा! अरिष्ट वृषभाचा आणि कालिय नागाचा प्रसंग असाच उत्सवाच्या वास्तव पार्श्वभूमीवर भासाने रंगविला आहे. हल्लीसक या गोपनृत्याचा उल्लेख आणि वर्णन तर येथे आहेच; पण भासाने हे नृत्याचे दृश्य प्रत्यक्ष रंगमंचावर आणून गोपजीवनाचे खरेखरे चित्र ( picture of pastoral life) उभे केले आहे. अद्भुताला मानुषी आकारात दृश्यरूप करण्याची आणि नैसर्गिक आणि अतिनैसर्गिक शेजारीशेजारी मांडण्याची नाटककाराची ही क्लृप्ती नाट्यरचनेच्या कुशलपणाचे एक गमक म्हणूनच मानावी लागेल.

(५)

चरित्रात्मक नाटकाला घटनांची संवादमय कंटाळवाणी जंत्री असे रूप येऊ नये म्हणून वास्तव आणि अवास्तव यांची विशेष तऱ्हेने गुंफण करीत असताना नाटककाराने नाटकाच्या आणि नाट्यप्रसंगांच्या लांबीरुंदीकडेही लक्ष दिले आहे असे वाटते. तुलनेने 'अभिषेक' पेक्षा 'बालचरित' आकाराने लहान आहे. नाटकातल्या कोणत्याही अंकाची लांबण लागत नाही. काही अंक तर एखाद्या दृश्यासारखे लहानसर आहेत. अशीच काळजी कृष्णचरितातील अनेक प्रसंग निवेदनाने सांगताना घेतली आहे. तिसऱ्या अंकाच्या आरंभी, अरिष्ट वृषभाशी केलेल्या द्वंद्वापूर्वी घडून गेलेले अनेक प्रसंग निवेदिले आहेत. हे निवेदन करताना

भाषेचे फुलोरे फुलवीत बसण्याचा मोह भासाने टाळला आहे आणि निवेदन आवश्यक मानून थोडक्यात उरकले आहे. त्यातच हे निवेदन वृंदावनातील गोपाच्या तोंडी योजून एखाद्या बालकाच्या लीलांचे वर्णन कौतुकाने आणि विस्मयाने करावे अशा कौटुंबिक भावाचा रंग त्याला आणला आहे. पाचव्या अंकाच्या आरंभी दामोदर आणि संकर्षण यांनी मथुरा नगरीत प्रवेश केल्यावर, मल्लयुद्धाच्या रंगात (Ring, arena), पाऊल टाकण्यापूर्वी, जे अनेक अद्‌भुत आणि वीर-पराक्रम केले त्यांचे निवेदन आले आहे. हे वर्णन नसते थोडक्यात केले आहे एवढेच नाही; त्यात एक घाई-गर्दी आहे आणि त्याची सांगड कंसाच्या उतावीळ उत्सुकतेशी घातली गेली आहे. दामोदर राजधानीत आल्यावर त्याच्या हालचाली कळून घेण्यासाठी कंस अत्यंत उत्सुक आहे. दूताला तो पाहून यायला सांगतो. एका पाठोपाठ बातम्या येतात. कंस घाईगर्दीने दूताला पिटाळतो आणि, भासाच्या विशिष्ट रंगसूचनेच्या पद्धतीप्रमाणे, दूत रंगमचावरून बाहेर जातो, क्षणार्धात पुन्हा प्रवेश करून वृत्त सांगतो; आणि ही जा-ये सारखी त्वरेने घडत रहाते; ती दामोदर आणि संकर्षण रंगशाळेत येतात तोपर्यन्त. या घाईगर्दीच्या वृत्तकथनात भास रंगभूमीचा त्याचा विशिष्ट संकेत पाळतो आहेच, पण ही घाईगर्दी कंसाच्या उतावळपणाशी आणि काळजीशी जुळलेली आहे; त्यामुळे या वृत्तकथनाला एक मानसशास्त्रीय रंग आहे हे लक्षात घेतले पाहिजे. शिवाय, या निवेदनातून येणाऱ्या बालचरिताच्या घटनांनी दामोदराचे व्यक्तिमत्त्व तयार होते; कंसभेटी-पूर्वीचे वातावरण निर्माण होते आणि आगामी प्रसंगाची अपेक्षित सूचनाही मिळून जाते. प्रत्यक्ष दृश्यातील चाणूर आणि मुष्टिक यांचा नाश आणि कंसाचा वध या घटनादेखील अतित्वरेने घडून येतात. ही मांडणी सहेतुक दिसते आणि तीत नाट्यप्रयोजन आहे, याची आता कल्पना यावी.

(६)

नाटक म्हणून 'बालचरिता'चे स्वतःचे काही विशेष आहेत त्यांच्याकडे लक्ष देणे जरूर आहे.

(१) अंकरचना करताना भास सादृश्य-तत्वाचा उपयोग हेतुपुरस्सर करताना दिसतो. रचनेच्या दृष्टीने पहिल्या आणि दुसऱ्या अंकाचे साम्य चटकन लक्षात येण्यासारखे आहे. दोन्ही अंकातील नाट्यघटनांची सुरुवात रात्रीच्या दृश्याने होते. जिथे घटना आणि अंकही समाप्तीला येतात त्या वेळी पहाट झालेली आहे. या दोन्ही अंकात एकेकच प्रमुख घटना मध्यवर्ती म्हणून आलेली आहे. असेच साम्य तिसऱ्या आणि पाचव्या अंकाच्या मांडणीतही दिसते. या दोन अंकात अनेक घटना दाटीवाटीने आलेल्या आहेत आणि त्या अतिशय त्वरेने घडून येतात. शिवाय, या दोन्ही अंकांना उत्सवाची समान पार्श्वभूमी आहे. तिसऱ्या अंकातील घटना गोपांचा

इन्द्रमह नामक उत्सव आणि त्याप्रसंगीचे हल्लीसक गोपनृत्य चालू असताना घडून येतात; तर धनुर्मह उत्सवाच्या निमित्ताने पाचव्या अंकातील घटना प्रवर्तित झाल्या आहेत. चवथ्या अंकात, पहिल्या दोन अंकाप्रमाणे, एकच प्रमुख घटना आहे पण खरे तर चवथा अंक तिसऱ्या अंकाचाच अतिदेश किंवा वर्धित भाग आहे. केवळ घटनास्थल बदलल्यामुळे त्याची स्वतंत्र अंक म्हणून मांडणी करावी लागली आहे.

दुसरे एक साम्य असे दिसते की प्रत्येक अंकात मृत्यूशी संबद्ध असा एक भीषण घातपाती प्रसंग घडून येतो : पहिल्या अंकात जन्मत:च मृत असे यशोदा–नन्दगोप यांचे अपत्य; दुसऱ्या अंकात कंसशिलेवर आपटून ठार केलेली बालिका; तिसऱ्या अंकात अरिष्ट वृषभाचा वध; चवथ्या अंकात कालियनागाचे दमन; पाचव्यात दोन मल्लांचा आणि कंसाचा नाश. ही भीषण दृश्ये नुसती सूचित नाहीत, रंगमंचावर दृश्य आहेत.

नाटकाचा आरंभ आणि शेवट नारदाच्या प्रवेशाने होतो हे मागे उल्लेखिले आहेच. चरित्रनायकाच्या जीवनाशी संबंधित असल्यामुळेच केवळ ज्या अनेक विस्कळित घटना एकत्र बांधल्यासारख्या वाटतात त्यांना या रचनेमुळे आता आणखी एक नाटकीय सूत्र लाभले आहे. त्याची दोन टोके नारदाच्या प्रवेशाने जणू बांधली जातात आणि समग्र नाट्यकथेला बंदिस्तपणा येतो.

(२) साम्याच्या तत्त्वाप्रमाणे विरोधाचे तत्त्वही भासाने या नाटकात अवलंबिले आहे. मात्र प्रसंग किंवा मनोभाव यांची विरोधी दृश्ये जी इथे दिसतात ती फार त्वरेने घडून येतात. या नाटकात लांबलचक संवाद असे नाहीतच; दृश्यप्रसंगांचीही लांबण लागलेली नसते. रचनेची अशी काटकसर नाटककाराने योजलेली असल्यामुळे एका प्रसंगातून किंवा मनोभावातून आपण दुसऱ्या प्रसंगात किंवा मनोभावात हळूहळू उतरतो आहोत, असे या नाटकात वाटतच नाही. त्यामुळे दोन प्रसंगातला किंवा मनोभावातला विकसनाने जाणवणारा विरोधही इथे एकदम जाणवत नाही. पण तो बारकाईने पाहिल्यावर लक्षात येतो. मात्र या गतिमान रचनेमुळे दोन विरोधी गोष्टी शेजारीशेजारी मांडून ठेवल्यासारख्या वाटतात. नैसर्गिक आणि अतिनैसर्गिक घटकांची जी मांडणी नाटककाराने केली आहे त्याविषयी अगोदर सांगितले आहेच. असेच विरोधाचे मिश्रण भीषण घटनांच्या बाबतीत दिसून येते. पहिल्या अंकात मृत अपत्य आहे; पण थोड्या वेळाने ते जिवंतही होते. कंसशिलेवर बालिका आपटण्यात येते, पण त्यातून देवी साकार होते. अरिष्ट वृषभाचा वध रंगमंचावर होतो; पण शेवटच्या क्षणी त्याला श्रीविष्णूच्या रूपाचा साक्षात्कार होतो आणि आपण आता स्वर्गात जाऊ या सुखभावनेने तो मरतो. कालियनागालाही दामोदराच्या दिव्य रूपाची ओळख पटते; आणि जाळणारे विषारी फूत्कार सोडणारा हा सर्प आपला सर्व परिवार घेऊन शांतपणे, विश्वास

देऊन निघून जातो चाणूर - मुष्टिक आणि कंस यांचा घराकन टाकणारा प्राणघात रंगमंचावर घडतो; पण तो अत्यंत त्वरेने; इथे फारशी भाषणे नाहीत, संवाद नाहीत. कंसवधानंतर सैन्य चालून येते; पण हाहाकाराचा आवाज उठतो न उठतो तोच संकर्षण सैन्याला थोपवून धरतो, वसुदेव शांतीची घोषणा करतो, आणि क्षणार्धात राजा उग्रसेन सिंहासनावर बसून वृष्णिराज्य प्रस्थापित झाल्याचे समाधानही दरवळते. प्रत्यक्ष प्राणघातानंतर शांतीची ही घोषणा जणू पुरेशी नाही म्हणून की काय नारदाच्या स्वर्गीय शब्दांनी परिरक्षणाची ग्वाही मिळते. मृत्यू, घातपात, भीषण घटना दाखवून त्यांच्या सांनिध्यातच शांतीचा आणि समाधानाचा सूर लगेच मिसळून देण्याची भासाची ही नाट्ययुक्ती अतिशय वैशिष्ट्यपूर्ण म्हटली पाहिजे.

(३) नाट्यशास्त्राप्रमाणे अनेक गोष्टी रंगमंचावर प्रत्यक्ष दाखवायच्या नसतात. त्यांत युद्ध, द्वंद्व, शारीरिक हल्ल्याचे आणि यातनांचे प्रकार, मृत्यू इत्यादी घटना आहेत; त्याप्रमाणे झोपेचे दृश्यही वर्ज्य आहे. पुढील संस्कृत नाटकांची रचना पाहाता या प्रथेचा आदर संस्कृत नाटककारांनी केलेला आहे, असेच दिसून येते. भासाचे नाट्यलेखन हा वर्ज्यावर्ज्याचा संकेत पाळीत नाही; मग त्याची कारणे काही का असेनात. प्राणघात, मृत्यू, जीवावरचे प्रसंग, रात्रीचे आणि स्वप्नाचे दृश्य इत्यादी संकेतबाह्य दृश्यांनी ' बालचरित ' नाटक ठासून भरलेले आहे. अर्थात अशी दृश्ये आणि मृत्यू भासाच्या इतर नाटकांतही पाहायला मिळतात भास एक चाकोरीबाहेर जाऊन लिहिणारा बंडखोर नाटककार तरी आहे, किंवा ज्या काळी त्याने नाटके रचली तेव्हा भरत-नाट्यशास्त्राचा अधिकार शिरसावंद्य मानण्याची अवस्था तरी आलेली नव्हती, असे काही तरी म्हटले पाहिजे.

(४) संस्कृत रंगमंचावर सहसा न दिसणारी दृश्ये भासाच्या नाटकांत दिसतात. पहिल्या अंकातील रात्रीच्या दृश्यासारखा प्रसंग त्रुटित ' चारुदत्त ' नाटकात आहे; ' अविमारक ' नाटकात तर रात्रीचे दृश्य आणि नायकाचा साहसी रात्रिसंचार दोन्ही आहेत. श्रीविष्णूच्या आयुधांना मानवी रूप देऊन रंगमंचावर आणण्याची कल्पना इथल्याप्रमाणे ' दूतवाक्य ' नाटकातही साकार झालेली आहे. राजलक्ष्मीचे मानवी रूप ' अभिषेक ' नाटकात इथल्याप्रमाणेच दृश्य केले आहे.

ही सारी दृश्ये वेगळी आहेतच आणि भासनाटकांतच ती पाहायला मिळत असल्याने भासाच्या नाट्यलेखनाचे वैशिष्ट्य म्हणूनच त्यांचा स्वीकार करावा लागतो. परंतु कलेच्या दृष्टीने कंसाच्या स्वप्नाचे दृश्यीकरण आणि त्याच्या अटळ नियतीचे मूर्त दर्शन हे दुसऱ्या अंकातील प्रसंग (चांडालकन्या आणि शाप यांचा प्रवेश) असाधारण आहेत. संस्कृत नाटकाच्या दृष्टीने त्याचे आगळेपण लक्षात येतेच. पण आधुनिक दृष्टीने पाहिल्यासदेखील हा एक नवीन रंग-प्रयोग वाटेल.

मानवी मनातील अर्धजागृत संज्ञाप्रवाह जाणिवेच्या बरोबर मूर्त करावेत, अदृष्ट नियतीला दृश्य करून, मानवी भाषेने तिला बोलायला लावून, आगामी परिणामांचे चित्र उभे करावे, अशा स्वरूपाचा हा कलात्मक प्रयोग आहे. कालिदासाच्याही अगोदर होऊन गेलेल्या भासासारख्या एका प्राचीन नाटककाराने नाट्यलेखनाचा हा असाधारण प्रयोग करावा याचे नवल जरूर वाटेल. पण कलाविषयक आदरही वाटणे जरूर आहे.

(७)

हे चरित्रात्मक नाटक घटनाप्रधान आहे. स्वभावचित्रणाला भासाने इथे कमी अवसर घेतला आहे. तशी कुठलीच व्यक्तिरेखा इथे खुलत फुलत नाही. नाटकात अनेक पात्रे असली तरी ती एक सांकेतिक तरी आहेत किंवा विशिष्ट प्रयोजनासाठी आणि प्रयोजनापुरतीच आलेली आहेत. स्वतः चरित्रनायक दामोदर दिव्यावताराच्या प्रेरणेने भारलेला, भारावलेला आहे. त्याची कृत्ये अपेक्षित अद्भुतपणाने आणि दैवी वीर्याने घडून येतात. भाविक मनाला दामोदराच्या व्यक्तिमत्त्वाचा अनुकूल स्पर्श झाला तरी मानवी मनाला काही जाणवावे असे या चित्रणात नाही. व्यक्तिचित्रणाच्या सुसंगतीसाठी भासाने या दिव्य अवताराला रंगमंचाच्या जमिनीवर आणले तरी वाव दिलेले नाही.

बहुतेक सर्वच पात्रांच्या बाबतीत असे घडते. काही चित्रणातले रंग मात्र पाहण्यासारखे आहेत. उदाहरणार्थ, वसुदेव आणि देवकी परिचित आणि सांकेतिक रूपानेच येतात. पण क्षणभर का होईना, अपत्यवत्सलता त्यांना मानवी अनुभवाच्या परिसरात आणते. बालकाच्या अलौकिकपणामुळे वाटणारा विस्मय आणि आनंद, त्याच्या सुरक्षिततेची काळजी, साहस करायला निघाल्यावर पावलोपावली धसका देणारी भीती, हे दोघांचे मनोभाव आपल्या मनालाही स्पर्श करणारे आहेत. देवकीपेक्षा वसुदेवाच्या चित्रणाला अधिक वाव मिळाल्याने त्याच्या स्वभावातले मानवी रंग अधिक स्पष्ट होतात. नन्दगोपाशी बोलताना आणि बालकाला घेण्यासाठी त्याचे मन वळविताना वसुदेव विनवणी, दडपण, केल्या उपकारांचे ओझे, अशी ही विविध मानसिक दडपणे आणतो ती मानवांच्या व्यवहारात अपरिचित थोडीच आहेत? वसुदेव कंसाशी खोटे बोलतो ते याच दृष्टीने पाहिले पाहिजे. आपल्या आणि जे आपले आहे त्याच्या रक्षणाची चिंता माणसाला खोटेपणा लबाडी, दुसऱ्यावर आक्रमण इत्यादी गोष्टी सहज शिकविते. माणसाचा हा दुबळेपणा आहे; म्हणूनच माणूस माणूस आहे.

नन्दगोपाचे चित्रण अधिक वेधक आहे. मुळात भासाने एक महत्त्वाचा फरक करून नन्दगोप हा वसुदेवाचा दास आहे, कंसाच्या आज्ञेवरून वसुदेवाने

त्याला काही अपराधाबद्दल फटके मारून पायात बेडी घातली आहे, असे दाखविले आहे. या पार्श्वभूमीवर नवजात अपत्यांच्या अदलाबदलीच्या प्रसंगाला एक विलक्षण भावनिक धार येते. नन्दगोप तसा दुर्दैवीच. गोप असूनही दास्यात पडलेला. एक 'दारी' (मुलगी) जन्माला आली, पण ती जन्मतःच मृत. प्रसूतीच्या क्षणी यशोदा बेशुद्ध झाली, ती अजून शुद्धीवर आलेली नाही. हे दुःख उराशी घेऊन नन्दगोप एकटा गोळवाड्याबाहेरच्या मोकळ्या जागी, अर्धरात्री बेडीने जड झालेला पाय उचलीत आला आहे. आपल्या घरच्या लक्ष्मीची दृष्टिभेटसुद्धा बालेने घेतली नाही याचे काहूर त्याच्या अंतःकरणात उठले आहे आणि शब्दातून फुटते आहे. नन्दाचे दुःख हे मानवाचे दुःख आहे. त्याचा सच्चेपणा भिडल्याशिवाय रहात नाही. वसुदेवाने मुलांच्या अदलाबदलीची कल्पना सांगितल्यावर नन्दाच्या मनात आणखी इतर भावनांचा संगर सुरू होतो. वसुदेवाने ज्या तऱ्हेने त्याला वागविले त्याचे शल्य प्रत्यक्षच आहे. पण कंसाची भीती त्याहून मोठी आहे. नन्दगोप वसुदेवाचे ऐकायला तयार होतो ते उपकाराच्या ओझ्याखाली. पण या दुर्दैवात आणि अगतिकपणातही नन्दगोपाची साधी माणुसकी मोठी झेप घेते. गोळवाड्यात दुसऱ्या दिवसापासून उत्सव सुरू होणार आहे. त्या सार्वजनिक आनंदावर आपल्या खाजगी दुःखाचे सावट पडू नये म्हणून बेशुद्ध पत्नीला तसेच सोडून मृत अर्भकाची विल्हेवाट लावायला तो एकटा गुपचूप मध्यरात्री घराबाहेर पडला आहे. स्वतःच्या दुःखाआधी इतरांच्या जीवनव्यवहाराचा विचार करणारा नन्दगोप सामान्य नव्हे. दास असला तरी स्वामीच्या वर त्याचे थोर स्थान आहे. नन्द कृतज्ञही आहे-जी कृतज्ञता माणूस म्हणविणाऱ्या प्राण्यांच्या अंगी दिसली तर एखादे वेळी दिसते. वसुदेवाने वाईट वागविले तरी त्याच्या स्नेहाची त्याला याद आहे गत-उपकारांची आठवण काढताच त्याच्या मनाची अढी उकलते, भीती दूर पळते. विलक्षण धैर्याने तो बालकाचा सांभाळ करायला सज्ज होतो. ही थोरवी ही अशीच मतलबी, सामान्य माणसांत न दिसणारी. बालकाला घ्यायचे ठरविल्यावर आपल्या अपवित्रपणाची आठवण होऊन तो घाईघाईने शुद्धी करायला निघतो. असे संस्कारी आणि सरळ मन असणारा हा नन्दगोप आहे. नाटकात नन्दगोप पहिल्या अंकानंतर पुन्हा दिसत नाही. पण तो आपल्या मनातून जाणार नाही.

गोपजीवनाची पार्श्वभूमी नाट्यप्रसंगांना देताना एका वृद्ध गोपाचे चित्र नाटककाराने उभे केले आहे. त्यातही अशीच वेधक आणि वास्तव छटा आहे. घोषात दामोदराच्या आगमनानंतर जीवनाची जी समृद्धी फुलून आली आहे तिने हा वृद्ध हरखून गेला आहे दामोदराच्या बाललीलांनी आणि अ-मानुष पराक्रमांनी त्याचा ऊर कौतुकाने आणि विस्मयाने भरून आला आहे. दामोदरावर काही संकट कोसळते आहे, तो काही अचाट कृत्य करायला सरसावला आहे, हे पाहाताच हा वृद्ध कासावीस होऊन जातो. उत्सवाच्या प्रसंगी तरुण गोप आणि सुंदर गोपकन्या दिमाखदार वेषभूषा करून आलेल्या पाहून आणि नृत्य-गीतामधली त्यांची

यौवनसुलभ बेहोषी पाहून या म्हाताऱ्यालाही हल्लोसक नृत्यात सामील होऊन नाचावेसे वाटते. तो नाचतोही; पण थोड्याच वेळात दमून जातो. तारुण्याची धुंदी थकलेल्या जीर्ण शरीराला कशी झेपावी? पण म्हातारा खूष आहे. तरुण मुलां–मुलींना नाचताना पाहून तृप्तीचा अनुभव घेऊ शकतो आहे. हा वृद्ध गोप देखील आपल्या मनात रहाणारा आहे.

परंतु या सर्वांहून भासाच्या असाधारण नाटचकलेचा खरा स्पर्श झालेला मला जाणवतो तो कंसाच्या चित्रणात. परंपरेप्रमाणे कंस हे दुष्ट पात्र, त्याचा बध म्हणजे एक अवतारी कृत्य. भासाने ही परंपरा पूर्णपणे अव्हेरली नाही. नारदाच्या मुखाने या अवतारकार्याची जाणीव आणि प्रतीती आपल्याला मिळते आहेच. परंतु दुष्ट म्हणून रूढ झालेल्या पात्रांच्या मनामध्ये डोकावून त्यांच्यातली काही माणुसकी शोधण्याचा कलात्मक प्रयत्न भासाने जसा इतर नाटकांतील रावण, वाली, दुर्योधन, कैकेयी या स्वभावरेखांच्या बाबतात केलेला आहे, तसे कंसाचे चित्रण करतानाही केलला दिसतो. कंसाचे दुष्टपण भासाने पूर्वजन्मावर नेले आहे. कंस हा पूर्वज–न्मीचा असुर असल्याचा उल्लेख नाटकात आहे. जोडीला भासाने मधूक ऋषीच्या शापाची योजना केली आहे कंसाचे सध्याचे जीवन पूर्वजन्मामुळे आणि शापामुळे झाकळले आहे. पूर्वजन्म आणि कर्म याबद्दलचे ज तत्त्वज्ञान आपल्या धर्म आणि संस्कृतीप्रमाणे आहे त्याप्रमाणे एखाद्या जीवनातील माणसाचे वर्तन या पूर्वजन्मामुळे निश्चित होत असते. त्याची पावले बांधल्यासारखी पडत असतात. या जीवनातील त्याची कृत्ये हेतूपूर्वक केलेली नसतात; तर अटळ नियतीच्या सामर्थ्यामुळे पूर्वज–न्मीच्या प्रभावामुळे आणि शापाच्या परिणामामुळे आपाततः घडत असतात. त्यामुळे प्रचलित जीवन तसे आक्षेपार्ह नसले तरी पूर्वीचे हे अनिवार्य संकेत त्याला सदोष बनवीत असतात. या धार्मिक तत्त्वज्ञानाची बैठक समजली म्हणजे लक्षात येते की पूर्वजन्माचे पिशाच्च कंसाच्या मागे लागले नसते तर कंसाचे वागणे आहे तसे झाले नसते कंस हा नियतीच्या पंजात अडकलेला एक दुर्दैवी प्राणी आहे. ही नियती कठोरपणे त्याला विनाशाकडे खेचून नेत आहे. कंस दुसरे काही करू शकत नाही. विनाशाकडे नेणारी कृत्ये करण्यावाचून त्याला गत्यंतरच नाही. म्हणजे हेतुपूर्वक दुष्ट कृत्ये करणाऱ्या नृशंस माणसापेक्षा, नियतीचा बळी झालेला एक दुर्दैवी माणूस, असा रंग कंसाच्या चित्रणात भासाने भरला आहे. आपल्या संस्काराप्रमाणे कंसाबद्दल सहानुभूता जरी वाटली नाही तरी त्याची कीव यावी असे हे चित्रण आहे.

त्याचबरोबर, माणुसकीचे आणखी काही रंग भासाने या चित्रात भरले आहेत. कंसाला पडलेले स्वप्न, अभूतपूर्व शकुनांची प्रतीती आणि या सर्वांमुळे त्याला भेदरवून टाकणारी अस्वस्थता या गोष्टी निखालस दुष्ट मनाच्या द्योतक नाहीत त्यांनी दिसते ते घाबरून गेलेले मानवी मन. कंसाच्या अंगी दर्प आणि

उद्दाम अहंकार नाही. व्याकूळ झालेल्या साध्या माणसासारखा तो राजज्योतिषी आणि राजपुरोहित यांना शकुनांचा अन्वयार्थ विचारतो; आणि तो कळल्यावर अधिकच व्याकूळ होतो. वसुदेवाच्या सत्यवक्तेपणावर त्याचा विश्वास आहे जन्मलेले सातवे मूल बालक नाही, बालिका आहे, याचा खरेखोटेपणा पडताळून पाहण्यासाठी वसुदेवाला तो भोळया विश्वासाने प्रश्न करतो. आत्मरक्षणासाठी वसुदेव खोटे बोलतो पण याची जाणीव कंसाला नाही. दुष्ट माणसाची संतप्त प्रतिक्रिया तर या कंसामध्ये दिसून येतच नाही. हे रंग संकटांनी घाबरलेल्या आणि त्यांतून बाहेर पडण्यासाठी वाटेल ते करण्यास उद्युक्त झालेल्या दुबळ्या मानवाचे आहेत. देवकीच्या सहा अपत्यांना कंसाने आजवर ठार केले ते आत्मरक्षणासाठी, असा या घातकी कृत्यांच्या मागे सूर आहे. स्व-संरक्षण ( Self – preservation ) हा तर जगन्-सृष्टीचा नियम आहे. या भूमिकेवर भासाचा कंस उभा आहे. यापुढे एक पाऊल टाकून भासाने या कंसाला अंत:करण दिले आहे. आपल्या कृत्यांची आंतरिक टोचणी दिली आहे. तो ही दुष्ट राक्षसाची द्योतक नाही. सातवे मूल मागायला निघताना कंस आपली अगतिकता वसुदेवापाशी बोलून दाखवितो; देवकीला आश्वासन देतो की ' मी तुझे दुसरे काही प्रिय करीन. दुष्ट माणसे असे बोलत नसतात, अशी वागत नसतात, म्हणूनच भासाचा कंस फार वेगळ्या पातळीवर आहे: अटळनियतीने भेदरलेला, आत्मरक्षणासाठी नाइलाजाने कठोर बनलेला, तरीही आपण जे करतो आहोत ते बरे नाही याची जाणीव असलेला, मन आणि हृदय असलेला, स्वत:चा राजशक्ती आणि वैभव सुरक्षेचे कवच आपल्या भोवती घालू शकेल की नाही या संदेहाने आणि चिंतेने दुभंगलेला, असा एक शापित माणूस कंसाच्या रूपाने रंगविला आहे. या कंसाचे वर्तमान जीवन विनाशोन्मुख आहे; पण जीवनाच्या अंती त्याला शांती मिळेल असा विश्वास वाटतो तो या वैशिष्टयपूर्ण चित्रणामुळे. हे वैशिष्टच भासाच्या नाटयकलेचा एक असाधारण गुण आहे.

(८)

कृष्ण-कथा आज जी उपलब्ध आहे ती पुराणग्रंथामधून. हरिवंश आणि भागवत हे या कथेचे मोठे आधार. पण देवकीपुत्र कृष्णाचा मागोवा उपनिषत्काला-पासून घेता येतो. कृष्ण आणि विष्णू यांच्या ऐक्यावर उभारलेले पांचरात्र आणि वैष्णव धर्म प्राचीन आहेत. महाभारतात कृष्ण आहे, तसे धार्मिक तत्त्वज्ञान आणि गीतेचा जीवनोपदेशदेखील आहेत कृष्णाच्या जीवनाभोवती ज्या अनेक कथा–

आख्यायिका आणि अद्‌भुताची वलये निर्माण झाली आहेत त्यांचा उगम आणि काल निश्चितपणे शोधून काढणे सोपे नाही. त्यामुळे कृष्णचरित्रावर नाट्यरचना करताना भासाची आधारसामग्री काय होती हे सांगणेही कठीण आहे. मात्र एक लक्षात येते की परंपरेने परिचित असलेली कृष्णाची जीवनगाथा आणि भासाने रंगविलेले बालचरित यांत तपशीलाचा काही महत्त्वाचा फरक आहे. (१) भासाच्या चित्रणाप्रमाणे कृष्ण–दामोदर हा देवकीचा सातवा पुत्र परिचित कल्पना तो आठवा पुत्र असल्याची आहे. (२) यशोदेला झालेली मलगी जन्मत: मृत होती, अपत्यांची अदलाबदल झाल्यावर ती एकाएकी जिवंत झाली असे भासाने दाखविले आहे. (३) नन्दगोप आणि वसुदेव यांचे नाते दास आणि स्वामी यांचे. नन्दाच्या काही अपराधाबद्दल कंसराजाच्या सांगण्यावरून वसुदेवाने त्याला चाबकाचे फटके मारून पायात बेडी अडकवलेली. या नात्याचा धाक आणि शल्य अपत्यांच्या अदला-बदलीच्या वेळच्या संवादात डोकावून जातात. (४) नन्दगोपाचे आणि विशेषत: कंसाचे भासाने केलेले व्यक्तिचित्रणही वेगळे आहे.

या अशा तपशीलातील काही भाग कृष्णकथेच्या वेगळ्या प्राचीन परंपरे-मधून आला असण्याची शक्यता आहे. काही नाटयरचनेसाठी म्हणून कल्पकतेने उभा केला असेल. कंसाचे स्वप्न, श्रीविष्णूची आयुधे, कात्यायनीचे गण, शाप, राजश्री यांचे समूर्त दर्शन, गोपजीवनाचे आणि गोपनृत्याचे चित्र हा नाट्य-रचनेचा आणि विशिष्ट नाट्यपरिणाम साधण्यासाठी नाटककाराने सहेतुक योजिलेला भाग म्हणून मानता येईल. कृष्णकथा नाट्यमय करताना दृश्यात्मक अनुभवात भव्यतेची प्रतीतीदेखील यावी असा कलेशी संबद्ध हेतू इथे असला पाहिजे.

'बालचरित' नाटकात आयुधांचा जो समूर्त प्रवेश आहे तो आणि कात्यायनीच्या दृश्य–भासात तिच्या गणांचे, विशेषत: देवीस्तुतीमध्ये शुंभ-निशुंभ यांचे जे निर्देश आहेत ते कालविपर्यासाचे द्योतक आहेत, असे काही अभ्यासकांचे म्हणणे आहे. हे निर्देश उत्तरकालीन आहेत. भासाच्या संभाव्य कालमर्यादेशी ते जुळण्यासारखे नाहीत. म्हणून 'बालचरित' हे नाटक भासाचे नाही असे हे अभ्यासक म्हणतात. त्रिवेंद्रम-नाटकांचे भासकर्तृत्व नाकारणाऱ्या विद्वानांची ही सर्वसामान्य भूमिका आहे. मला ती पटलेली नाही. 'बालचरितापुरते' बोलायचे तर पुराणकथा आणि त्यातील निर्दिष्ट व्यक्ती यांचा काल निश्चित करण्याजोगी

एतिहासिक साधने आपल्यापाशी नाहीत. आणि हे निर्देश उत्तरकालीन ठरले सरी त्यावरून सबंध नाटकच कसे उत्तरकालीन ठरते? प्राचीन काळी ग्रंथामध्ये-म्हणजे त्यांच्या हस्तप्रतीत–प्रक्षेप सहज होत. या नाटकातील काही भाग अक्षा मागून कोणीतरी रचून घुसडून दिला असेल. सर्व नाटकच प्रक्षिप्त म्हणण्याइतकी उडी घ्यायचे काय कारण आहे? उलट, भासाची म्हणून जी काही रचनेची, स्वभावचित्रणाची वैशिष्ट्ये या नाटकांच्या अभ्यासातून आपल्या हाती येतात, त्यांचा आढळ जर 'बालचरित' नाटकात आहे तर भासाचे कर्तृत्व अव्हेरणे कितपत प्रामाणिकपणाचे होईल?

भासाची 'स्वप्नवासवदत्त' 'ऊरुभंग' 'प्रतिमा' अशी जी थोर नाटके आहेत त्यांची कलात्मक उंची 'बालचरित' नाटकाला नाही, हे खरे. भासाच्या नाट्यकर्तृत्वाच्या दुसऱ्या, तिसऱ्या कालखंडातले हे नाटक असावे असे मला वाटते. पण परिपक्व कालातले नसूनही या नाटकात भासाची काही वैशिष्ट्ये उतरली आहेतच आणि कलेच्या दृष्टीने त्यांचे मोल मानलेच पाहिजे. या नाटकाकडे लक्ष वेधण्यात हा एक हेतु.

● ● ●

# बालचरित

## (पाच अंकी नाटक)

# पात्रे

(प्रवेशानुक्रमाने)

| | | |
|---|---|---|
| (अंक १) | सूत्रधार | |
| | नारद | |
| | देवकी (बालकाला घेऊन) | |
| | वसुदेव | |
| | नंदगोप (मृत बालिकेला घेऊन) | |
| | गरुड | श्रीविष्णूचे |
| | चक्र | वाहन |
| | शार्ङ्ग | आणि |
| | कौमोदकी | आयुधे |
| | शंख | (मानवरूपात) |
| | नन्दक | |
| (अंक २) | चांडालयुवती | |
| | राजा कंस | |
| | शाप (मधुक ऋषीचा) | |
| | राजश्री (कंसराज्याची अधिदेवता) | |
| | शापाचे सहचर | |
| | प्रतिहारी (यशोधरा : कंसाची द्वारपालिका) | |
| | कांचुकीय (बालाकि) | |
| | प्रतिहारी (देवकीची द्वारपालिका) | |
| | दाई (आणि रक्षक) | |
| | कात्यायनी | |
| | कुण्डोदर शूल, नील, मनोजव (कात्यायनीचे परिचर) | |

(अंक ३) वृद्ध गोपालक
दामक (गोपालयुवा)
गोपकन्या (घोषसुंदरी, वनमाला, चंद्ररेखा, मृगाक्षी)
दामोदर (गोपाळांसमवेत)
संकर्षण
अरिष्टर्षभ (असुर, गोवेषधारी)

(अंक ४) कालिय (यमुनाडोहातील नाग)
सैनिक (कंसाचा दूत)

(अंक ५) सैनिक (ध्रुवसेन)
प्रतिहारी (मधुरिका: कंसाची द्वारपालिका)
चाणूर, मुष्टिक (कंसाच्या सेवेतील मल्ल)
(वसुदेव आणि गोपालक : मथुरेचे प्रजाजन)
उग्रसेन (कंसाचा पिता)

# रंगस्थल

अंक १ : मथुरा : कंसाच्या राजवाड्याजवळील देवकीचे दालन; यमुनानदी; गौळीवाड्याच्या सीमेवर. मध्यरात्र ते पहाट.

अंक २ : मथुरा : राजवाड्यातील कंसाचे शयनगृह मध्यरात्र ते पहाट.

अंक ३ : घोष : नंदगोपाचा गौळवाडा; नृत्ययोग्य मोकळा परिसर.

अंक ४ : घोष : यमुनेच्या काठाजवळ (अंक ३ - ४ सलग)

अंक ५ : मथुरा : कंसाची राजधानी; उत्सवासाठी सजवलेला रंग, वर गच्ची

– भासनाटकचक्रातील –

# बालचरित

## अंक १ ला

[ नान्दी संपल्यावर सूत्रधार प्रवेश करतो. ]

सूत्रधारः– पूर्वी कृतयुगामध्ये शंख आणि दूध यांच्यासारखी (धवल कांति ) असलेला, ज्याला 'नारायण' नावाने ओळखीत,

त्रेतायुगात, तीन पावलांनी तिन्ही भुवने व्यापणारा, सुवर्णप्रभा असलेला, जो 'विष्णू'

द्वापरयुगात, दूर्वांप्रमाणे नील कांतीचा, रावणवधाच्या प्रसंगी जो 'राम'

कलियुगातील काजळासारखा, तो 'दामोदर'

तुमचे नित्य रक्षण करो ! ॥ १ ॥

अशी मी सज्जन समाजाला विज्ञप्ती करीत आहे. अरे, मी विनंती करण्यात व्यग्र असताना जणू आवाजसा ऐकू येत आहे? बरे तर, पहातो.

[पडद्याआड]

"आकाशात संचार करणारा मी - - - - -"

ठीक, आले लक्षात.

हो पुष्पवृष्टी ( खाली ) पडत आहे;
देवतांच्या दुंदुभि निनादत आहेत;
वृष्णिकुलामध्ये जन्म घेतलेल्या हरीला पाहण्यासाठी
हे नारद त्वरेने आलेले आहेत. ॥ २ ॥

[असे म्हणून जातो.
इथे स्थापना झाली.
नंतर नारद प्रवेश करतो ]

नारद – आकाशात संचार करणारा मी
तिन्ही लोकांमध्ये विश्रुत आहे.
मी कलहप्रिय नारद
ब्रह्मलोकाहून इथे आलो आहे. ॥ ३ ॥

अहो,

देवासुरांचे झगडे ओसरले असता
नेहमी अति शांत असणाऱ्या अंतरिक्षामध्ये
माझे मन रमत नाही.
वेदाध्ययनानंतरच्या ( विश्रांतीच्या काळात )
मी ( एकीकडे ) वीणेच्या तारा घट्ट करतो
आणि ( दुसरीकडे ) झगडे लावतो ! ॥ ४ ॥

आणखी असे की,

पितामह ( ब्रह्मदेवा ) च्या वचनांवर
माझी निरतिशय भक्ती आहे.
सर्व तपोवने मला अति आदराची आहेत.
मी खरेच सांगतो –
नखांनी आघात केलेली वीणा
आणि भयंकर, तीव्र अशी वैरं (आणि) भांडणे
मला आवडतात ! ॥ ५ ॥

तर ( सांगायचे म्हणजे ) लोककल्याणार्थ कंसवधाच्या हेतूने वृष्णिकुलात जन्म घेतलेल्या अनादि, अनंत, शाश्वत अशा भगवान नारायणांना डोळ्यांनी पाहावे म्हणून मी इथे आलो आहे अरे, ही वंदनीय देवकी इथे आहे. मायेने मूल झालेल्या त्रैलोक्याच्या ईश्वराला हातांवर घेऊन वसुदेवासह ती हळूहळू आपल्या निवासस्थानातून बाहेर येत आहे. जी ही – – –

चंद्राप्रमाणे ( फिक्या ) चेहऱ्याची, ( मन ) पूर्ण शांत केलेली,
लोकांना अभय देणाऱ्या,
दैत्यांचे निधन करणाऱ्या,
( सर्व ) देवांचा गुरु, (सुदर्शन) चक्रधारी,
अशा (भगवान नारायणाला) –
दुःखाने व्याकूळ झालेली (असूनही)
मन्दर पर्वत उचलून न्यावा त्याप्रमाणे
(या) रात्रीच्या वेळी
(आपल्या) दोन्ही हातांनी घेऊन येत आहे ॥ ६ ॥

अरे, अरे, हे प्रत्यक्ष भगवान नारायण –
ज्यांच्या पराक्रमाला अंत नाही,
असुरांच्या पराक्रमाचा ज्यांनी नाश केला आहे.
देवांच्या स्वामीचेही जे स्वामी,
त्रैलोक्याची पताका, जगताचे निर्माते,
सर्व प्राणिमात्रांचे पोषणकर्ते,
कमलाप्रमाणे दीर्घ नेत्र असलेले, जे पुराण पुरुष
(ते हे होत) ! ॥ ७ ॥

वा, वा ! हे भांडणाचे मूळ उत्पन्न झाले ! तेव्हा आता आपणही भगवान नारायणांना प्रदक्षिणा घालून ब्रह्मलोकाप्रत जावे.
त्रैलोक्याचे (मूळ) कारण अशा भगवंताना (माझा) नमस्कार –

मनुष्यलोकाविषयी प्रेम असणाऱ्या आणि त्याच्या
रक्षणासाठी तत्पर असणाऱ्या,
जगताचे प्रतीक, कमलाप्रमाणे स्वच्छ नेत्र असलेले,
रावणाचे तेज भ्रंश करणारे, राम,
अशा पराक्रमाचे माहेरघर असणाऱ्या,
उत्कृष्ट वीराला, नारायणाला
(हा) नमस्कार. ॥ ८ ॥

[जातो]

[नंतर बालकाला घेतलेली देवकी प्रवेश करते.]

देवकी – अरेरे! जन्माच्या वेळी उत्पन्न झालेली, माझ्या बाळाचे महानुभावत्व सुचविणारी महान (शुभ) निमित्ते प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहात असताना सुद्धा दुष्ट कंसाच्या क्रूरपणाचा विचार दाटून या मंदभागिनीला विश्वासच वाटत नाही ! हे ... ... आर्यपुत्र कुठे गेलेत बरे ? (गोल फिरून, पुढे पाहात) अगबाई, आनंदाने आणि आश्चर्याने डोळे विस्फारले आहेत असे हे आर्यपुत्र इकडेच येत आहेत.

[नंतर वसुदेव प्रवेश करतो.]

वसुदेव – (विचार करीत) अहो, हे आहे तरी काय?
आकाशात वीज लोळते आहे ......
प्रचंड वावटळीत गरगरणाऱ्या नवमेघांच्या
कडकडाटांनी पृथ्वी गदगदा कापते आहे .. ...
आणि इकडे जगात तर–

असुरांच्या मेळाव्याचा नाश करणारा विष्णु
प्रजाजनांचे रक्षण करण्याच्या उद्देशाने
अवतीर्ण झाला नाही? ॥ ९ ॥

(पाहून) ही देवकी–
दुःख-कष्टांची तमा न बाळगता,
सहा पुत्रांच्या नाशाचे (दुःख) विसरण्यासाठी,
सातव्याला जपणारी,
जन्मकाळी (प्रकटलेल्या) (शुभ) शकुनांमुळे
अनेक गुणांवर लोभावलेली,
पुत्राला–नव्हे, कंसाचा मृत्यू असेच नाव दिलेल्याला –
घेऊन (येत आहे). ॥ १० ॥

देवकी – (जवळ येऊन) आर्यपुत्रांचा जय हो !

वसुदेव – देवकी, अर्धी रात्र झाली आहे. मथुरा नगरीतील सारे लोक गाढ झोपेत आहेत. तेव्हा कोणाची नजर जायच्या आत बाळाला घेऊन मी निसटतो.

देवकी – याला आपण कुठे घेऊन जाणार?

वसुदेव – देवकी, तू म्हणतेस ते खरेच. मला स्वत:लाही ठाऊक नाही. पण दुष्ट कंसाच्या एकछत्र आज्ञेखाली ही सर्व पृथिवी आहे. तर या चिरंजीवाला कुठे म्हणून न्यावे बरे? किंवा, जिथे दैवाची योजना असेल तिथे बाळाला घेऊन मी निघून जातो.

देवकी – आर्यपुत्र, मला त्याला एकदा नीट पाहून घेऊ द्या.

वसुदेव – अग, बाळावर तुझा फारच जीव आहे–
याला काय पाहायचं? राहूच्या जबड्यात (सापडलेला)
हा चंद्र आहे ......
तू याला किती (वेळ) पाहिलेस तरी
कंस याचा मृत्यू होणार आहे ........... ॥ ११ ॥

देवकी – काही झाले तरी (असे) होणार नाही.

वसुदेव – तू बोललीस, ते सर्व दैवतांनी बोलल्यासारखे होवो !
आण (त्याला इकडे).

देवकी - द्या, आर्यपुत्र.

वसुदेव - (बाळाला घेऊन) बापरे, किती जड आहे बाळ! छान-

विंध्य आणि मंदर पर्वताचे सत्व असलेला
कमळाच्या पाकळीसारख्या डोळ्यांचा हा ऐश्वर्यसंपन्न बाळ
जिने आपल्या गर्भात वागवला
त्या स्त्रीच्या सहनशक्तीची (कमाल आहे)! ॥ १२ ॥

देवकी, तू आता आत जा.

देवकी - कमनशिबी मी ... ... जाते बापडी. [जाते.]

वसुदेव - हां देवकी–
आकाशात आणि पाण्यात (प्रतिबिंबामुळे)
चंद्राची कोर जशी दुभंगली जाते तशी,
हृदयाने इथे (बाळाजवळ), शरिराच्या अवयवांनी
मात्र तिकडे, अशी दुभंग होऊन जाते आहे. ॥ १३ ॥

असो ... देवकीने (अंतर्गृहात) प्रवेश केला. तर मी पण
नगराच्या दाराचा आसरा घेतो. अहो, मी तर –

मंदर पर्वत बाहूंनी उचलून त्याचा त्याप्रमाणे
या बाळाला घट्ट पकडून,
पहिल्या पुत्राच्या नाशाची वेदना बाळगीत,
राजभयाने व्याकूळ झालेला,
झराझर पावले उचलीत रस्ता काटतो आहे. ॥ १४ ॥

(गोल फिरून) हे नगरद्वार.... तर शिरतो आत. (प्रवेश करून)
अरे, मथुरा नगरीत सर्व लोक गाढ निद्रिस्त आहेत! तेवढ्यात
आपण दूर सटकावे. (गोल फिरून) मथुरेतून तर बाहेर पडलो.
अहो, किती घनदाट हा अंधार! या वेळी तर-

अंधार सर्वांवर जणू पुटे चढवीत आहे,
आकाशातून काजळ कोसळते आहे,
दुष्ट माणसाच्या केलेल्या चाकरीप्रमाणे
दृष्टी विफल झाली आहे! ॥ १५ ॥

काय हे अंधाराचे सामर्थ्य!

दिशा जणू अंधारल्या आहेत ......
झाडे (दगडासारखी) सज्जड झाली आहेत

आपापल्या जागी योग्य आकारात असलेले परिचित जग
रूप पालटून बसले आहे ! ॥ १६ ॥

(पुढे) जायची मला ताकदच नाही. अरे, हा दिव्याचा प्रकाश (दिसतो आहे)! असे तर नसेल की दुरात्मा कंस माझ्या निसटून जाण्याची खबर मिळून, मशालींच्या वेढ्यात मला पकडण्यासाठी येतो आहे? ठीक आहे ...... मी त्याचा गर्व उतरवून टाकतो! (तलवार खेचून काढतो. मागे वळून, पाहात) अरे, कोणीही दिसत नाही! हं......

सर्व जग अंधाराने झाकळले असता
मला वाट दिसत नसल्यामुळे,
मला निसटून जाता यावे या हेतूने
बाळाने (ही) प्रकाशज्योत (निर्माण) केली आहे ! ॥ १७ ॥

ही पाऊलवाट ......तर निघतोच पुढे. अरे, ही भगवती यमुना पावसाळी पुराने भरून गेली आहे! अहो, माझ्या परिश्रमावर पाणी पडले! आता काय करू बरे? ठीक ...... आले लक्षात-भिऊन (कष्टून) काही उपयोग नाही.

सुसरी, साप यांनी भरलेली,
प्रचंड लाटा उसळत असलेली,
मनाने सुद्धा पार करायला कठीण अशी ही नदी
हातांची वल्हे करून मी चटकन पार करतो......
देव पाठीशी असेल तर मला यश मिळेलच. ॥ १८ ॥

( तसे करून, पोहून जात, आश्चर्याने ) अहाहा, जलप्रवाह दुभंग झाला....इथे स्थिर आहे...इथे धावतो आहे ! दैवी (नदीने) मला उतार दिला. (नदी पार करून) यमुना पार करून बाहेर तर पडलो! अरे, हुंकारासारखा, आवाज ऐकू येतो आहे. कोणी बापडा गौळ-वाड्यानजीक असावा......हो.... इथे गौळवाड्यानजीक माझा मित्र नंदगोप वसतो करून राहिला आहे. कंसाच्या आज्ञेमुळे मी त्याला बेड्या घातल्या होत्या, चाबकाने मारले होते---आत तर जाऊ या. पण... रात्रीच्या वेळी वसुदेव आला म्हणून हे बिचारे गोप भयभीत होऊन जातील. तेव्हा, या वडाच्या झाडाखाली रात्र सरून पहाट होईपर्यंत वाट पहावी. अहो, अहो, वटवृक्षावरील देवतांनो, हा बाळ जर लोककल्याणासाठी, कंसाचा वध करण्यासाठी, वृष्णिकुळात जन्मला असेल, तर गौळवाड्यातून कोणाला इकडे येऊ द्या--नाही, तसे नको +-- माझ्या मित्राला नंदगोपालाच येऊ द्या !

[ नंतर बालिकेला घेऊन **नंदगोप प्रवेश करतो.** ]

नंदगोप – (शोक करीत) बाळे, बाळे, आमच्या घरच्या लक्ष्मीमध्ये न रमता तिथून आम्हांला सोडून अशी का चाललीस बरे? आणि याच वेळी शेकडो रेडयांचा मेळावा जमावा तसा अंधार दाटला आहे.

पावसाळयाने चांदणे हरवले आहे,
वस्तूंचे आकार लोपले आहेत,
अशी ही रात्र
निळी साडी नेसलेल्या, सर्वांग लपेटून झोपी गेलेल्या
गोपीसारखी झाली आहे ॥१९॥

आज मध्यरात्रीला आमच्या कुटुंबाने, यशोदेने जन्म दिलेली ही मुलगी जन्मताच मरण पावली आहे. उद्या आमच्या गौळवाडयाला साजेसा इन्द्रयज्ञ नावाचा उत्सव व्हायचा आहे. गोपजनांना हे दुःख भोगावे लागू नये म्हणून, पायात जड बेडया असतानाही, या मुलीला घेऊन मी एकटाच बाहेर पडलो आहे. बिचारी यशोदा --- आपण मुलाला जन्म दिला की मुलीला, याचे तिला भान नाही --- ती मूर्च्छित झाली आहे. बाळे, बाळे -

वसुदेव – कोण बरे हा रात्रीच्या वेळी शोक करतो आहे? बिचारा आमच्यासारखाच दुर्दैवी दिसतो!

नंदगोप – आमच्या घरच्या लक्ष्मीमध्ये न रमता तिथून आम्हांला सोडून अशी का चाललीस बरे!

वसुदेव – बोलण्याच्या आवाजावरून ओळख पटते आहे. माझा मित्र नंदगोपच असावा. तर हाक मारतो. मित्रा नंदगोपा, इकडे ये.

नंदगोप – (घाबरून) बापरे! हा कोण ओळखीच्या आवाजाने (पूर्वी ऐकलेल्या स्वराने) 'नंदगोप, नंदगोप' अशी हाक मला या वेळी मारतो आहे? राक्षस तर नसेल? का, पिशाच्च? थरकाप उडविणाऱ्या या अशा रात्री मेलेली मुलगी माझ्या हातात आहे काय बरे करू?

वसुदेव – मित्रा नंदगोपा, भलतासलता संशय घेऊ नकोस. इकडे ये.

नंदगोप – (कान देऊन, सावधपणे) अरेच्या, आवाजावरून तर धनी वसुदेव वाटतात. तर, जातो जवळ. पण...... (त्यांच्या) जवळ जाऊन मला काय करायचे? याने राजा कंसाचे बोलणे ऐकून, माझ्यावर आरोप केला, चाबकाचे फटके मारून मला बेडया घातल्या तर नाहीच जाणार

मी. पण पण ...... माझ्या दुष्टपणाचा धिक्कार असो! माझी हजार प्रकारे चाहा केला आहे ...... (माझ्या) दुःखाने दुःख झाले ...... सुखाने सुख वाटले .... तरी मी मात्र राजाच्या आज्ञेवरून केलेले एक बंधन आठवीत बसलो आहे ! तर जातो (त्यांच्या) जवळ. ही मुलगी .... काय बरें करू? हं .. असेच करावे. (जवळ जाऊन आणि पाहून, आश्चर्य दाखवीत) रात्र सरून पहाट झाली. हे ध वसुदेवनी मुलाला घेऊन उभे आहेत. (जवळ जाऊन) धन्याचा जय हो!

वसुदेव – मित्रा नंदगोपा, (आपल्या) दैवी गाई सुखरूप आहेत ना?

नंदगोप– होय धनी, सुखरुप आहेत

वसुदेव – तुमचे नोकरचाकर कुशल?

नंदगोप – नोकरचाकरांचे म्हणता? होय धनी, कुशल.

वसुदेव – मित्रा, या वेळी लपवाछपवी का?

नंदगोप – धनी, तसे काही नाही

वसुदेव – माझ्या प्राणांची शपथ आहे, खरे बोलला नाहीस तर !

नंदगोप – इलाज नाही! ऐकावे, धनी. आज मध्यरात्रीला आमच्या कुटुंबाने– नाही, नाही, तुमच्या दासीने–यशोदेने या मुलीला जन्म दिला ...... बिचारीने जन्मताच डोळे मिटले. उद्या आमच्या गौळवाड्याला साजेसा इंद्रयज्ञ नावाचा उत्सव व्हायचा आहे. तेव्हा हे दुःख गोपजनांना भोगावे लागू नये म्हणून, बेडचांनी पाय जड झाले असताही मी एकटाच मुलीला घेऊन बाहेर पडलो आहे. बिचाऱ्या यशोदेला माहीत नाही की आपण मुलाला जन्म दिला की मुलीला ...... ती बेशुद्ध आहे.

वसुदेव – अरे अरे! जगाला ज्याचा आधार त्या कृतान्ताला चकविणे शक्य नाही! मित्रा, हा मृतदेह लाकडासारखा झाला आहे, टाकून दे.

नंदगोप – नाही हो टाकवत धनी, नाही टाकवत.

वसुदेव – लोकधर्म असा आहे ...... टाकून दे.

नंदगोप – जशी धन्यांची आज्ञा. बाळे, बाळे! (त्याला रडू फुटते )

वसुदेव – मित्रा, असा रडू नकोस, रडू नकोस. ऊठ, ऊठ पाहू.

नंदगोप – (उठून, जवळ जाऊन) धन्यांचा जय हो ! या दासान आता काय करावे?

वसुदेव – मित्रा, दुरात्मा कंसाने माझे सहा पुत्र मारून टाकले हे तुलाही ठाऊक आहे.

नंदगोप – ठाऊक आहे धनी, ठाऊक आहे.

वसुदेव – तर हा सातवा ...... त्याला दीर्घायुष्य लाभो ! माझ्या नशिबी पुत्रांचे भाग्य नाही...तुझ्या भाग्यामुळे हा जगावा म्हणून हयाला घे.

नंदगोप – भय वाटते धनी, भय वाटते! कंसराजाच्या जर कानी गेले, की वसुदेवाचा मुलगा नंदगोपाच्या हाती ठेव म्हणून ठेवला आहे ......आणखी काय सांगू? माझे डोके धडावर राहणार नाही!

वसुदेव – (स्वतःशी) अरेरे, कार्याला हे संकटच! कोण काय बोलले हे दुष्ट माणसांना समजल्याशिवाय रहात नाही. तर असा प्रस्ताव करतो.
(उघड) मित्रा नंदगोपा,
मी जर तुमचा असेन (आणि) तुमच्यासाठी
मी पूर्वी काही केलेले असेल
तर त्याची तू परतफेड करण्याची वेळ
आलेली आहे. ॥ २० ॥

नंदगोप – काय परतफेड म्हणता? कंस असो, नाही तर कंसाचा, पिता उग्रसेन असो ! धनी, बाळाला (माझ्याकडे) द्या.

वसुदेव – मित्रा, घे.

नंदगोप – धनी, मला अशौच आहे ...... मेलेल्या मुलीला मी घेतले आहे. तेव्हा धन्यांनी घडीभर थांबावे. तेवढ्यात यमुनेच्या पाण्याजवळ जाऊन मी शुद्धी करतो.

वसुदेव – मित्रा, (तू) गौळवाड्यात रहात असल्याने जात्याच शुद्ध आहेस.

नंदगोप – तर मग आमच्या गौळवाड्याच्या रिवाजाप्रमाणे मातीने शुद्धी करतो.

वसुदेव – यात काहीच दोष नाही. कर शुद्धी.

नंदगोप – जशी धन्यांची आज्ञा. (तसे करून–माती अंगाला लावून आश्चर्याने) आश्चर्य, आश्चर्य, धनी! नवल आहे! मी मातीचे कण शोधीत होतो तर जमीनीला भेग पडून दोन वावभर पाण्याची धार उसळली!

वसुदेव – बाळाचाच हा प्रभाव. कर आता शुद्धी.

नंदगोप – धनी, ठीक. (तसे करून, जवळ जाऊन) धनी, मी तयार आहे.

वसुदेव – घे.

नंदगोप – धनी, माझे हात फार दुबळे आहेत, मंदर (पर्वता)सारख्या बाळाला घ्यायची त्यांच्यात ताकद नाही.

वसुदेव – मित्रा, तुझी ताकद आणि पराक्रम फार मोठे आहेत.

नंदगोप – माझ्या ताकदीचे किस्से धन्यांनी ऐकावेत : (माजावर आलेल्या, जमीन) उकरीत (धावणाऱ्या) बैलाला शिंग पकडून मी सुटका करतो. चिखलात रुतलेले मालांनी भरलेले गाडे मी घट्ट उचलून काढतो. आणि असे असले तरी या क्षणी (या) बाळाला उचलून घ्यायची ताकद माझ्यात नाही!

[नंतर श्रीविष्णूची पाच आयुधे आणि गरुड प्रवेश करतात.]

गरुड – मी गरुड पक्षी. प्रचंड वेगाचा. शार्ङ्ग (धनुष्यधारी विष्णू) चा मी रथ आणि ध्वजही.
देवासुरांच्या संग्रामामध्ये प्राचीन काळी, विष्णूचेच सामर्थ्य घेऊन मी विष्णूला वाहून नेले आहे. ॥ २१ ॥

चक्र – कृष्णाच्या करांगुलीत शोभणारा मी (सुदर्शन) चक्र.
भर दुपारच्या सूर्याप्रमाणे माझे तेज प्रखर आहे.
(श्रीविष्णूने) तीन पावलांनी (त्रिभुवनें) व्यापली तेव्हा
आणि अमृतमंथनाच्या प्रसंगी
असुरांचे आणि दैत्यांचे समूह
मी गारद केले आहेत. ॥ २२ ॥

शार्ङ्ग – ज्याचा गोल आणि नाजूक मध्यभाग विष्णूने हातात
पकडला आहे तो मी शार्ङ्ग (धनुष्य) –
स्त्रीदेह धारण केला असला तरी शक्ती आणि पराक्रमात
मी पुरुषाचा गर्व खाली करीन.
युद्धाला तोंड लागले असता,
हत्ती, घोडे, रथ आणि सैनिक यांची पांगापांग करून
शत्रूंच्या झुंडीचा
मी, विष्णूच्या साठी, चेंदामेंदा केला आहे. ॥ २३ ॥

कौमोदकी – मी कौमोदकी नावाची हरीची गदा.
आज्ञा झाली म्हणजे सर्व शत्रूंचा चुराडा करून,
युद्धामध्ये मी मारलेल्या दानवांच्या रक्ताच्या नद्यांमध्ये
मी क्रीडा केली आहे. ॥ २४ ॥

शंख – क्षीरसमुद्रातून विष्णूने स्वतःच वर काढलेला शंख तो मीच.
युद्धामध्ये देवांचे ते शत्रू माझ्या घोषाने नष्ट होतात. ॥२५ ॥

नंदक – मी नंदक (तलवार). संग्रामामध्ये
माझ्यासमोर कोणीही उभा राहू शकत नाही.
सर्वशक्तिमान विष्णूनी नुसते स्मरण केले
की मी (कार्यसिद्धीसाठी) जाते. ॥ २६ ॥

चक्र – दैत्यांचा संहार करणारे आम्ही –
चक्र, शंख, शार्ङ्ग, गदा, नंदक,
वासुदेवाच्या कार्य (सिद्धी) साठी
एकत्र होऊन आलो आहोत. ॥ २७ ॥

तर, चला. मनुष्यलोकात अवतार घेतलेल्या भगवान विष्णूचे बाल-चरित कार्यरूप करण्यासाठी गोपाळांचा वेष घेऊन आपण (या) गोळवाड्यातच उतरू या.

सर्व – ठीक आहे. [विष्णूजवळ जाऊन उभे रहातात.]

वसुदेव – मित्रा, बाळाला नमस्कार कर.

नंदगोप – आज्ञा, धनी. राजपुत्रा, तुला नमस्कार. (पुन्हा) नमस्कार. बरे, असो. (तू) स्वतःच्या (सामर्थ्यानेच) स्वतःला घेऊन जा. आम्ही

साधे गवळी, तुला (उचलून) घेऊन जाण्याइतके बळ आणि पराक्रम आमच्याजवळ कसे असणार ?

चक्र – भगवान नारायणांना नमस्कार. भगवन् महाविष्णो,

देवांची आणि असुरांची
पुष्कळ कार्ये आणि अकार्ये
या जगात जी घडून येतात ती तुझ्या (प्रभावा)मुळे !
तेव्हा, हे यदुवंशाच्या केतो,
या (नंदगोपा) साठी, हलकेपणा धारण करून,
या जनावर कृपा कर. ॥ २८ ॥

वसुदेव – घे.

नंदगोप – जशी धन्यांची आज्ञा. (बाळाला घेतो.)

वसुदेव – मित्रा, तांबडे फुटले आहे. तू (आता) माघारी फिरावेस.

नंदगोप – धनी, आश्चर्य, अहो, केवढे आश्चर्य ! माझ्या या बेड्या (आपोआप) गळून पडल्यात !

वसुदेव – हा सर्व कुमाराचा प्रभाव ! आता जा परत.

नंदगोप – जशी धन्यांची आज्ञा.

वसुदेव – पण (थांब), जरा इकडे ये.

नंदगोप – धनी, हा आलो.

वसुदेव – तू स्वभावाने नेहमीच प्रेमळ आहेस हे मी जाणतो. पण या (बाळा) वर (माझाही) प्रेमभाव फार जडला आहे म्हणून विनंती :

बहुतेक जळून जाऊन (एवढेच) उरलेले
यादवांचे (हे) बीज
सुरक्षित रहावे म्हणून, या वेळी,
(तुझ्या हाती) ठेव म्हणून (दिले आहे.) ॥ २९ ॥

कुमाराची देखभाल कशी कराल तुम्ही ?

नंदगोप – ऐकावे धन्यांनी. एका घरी जाऊन (हा) दूध पिईल. दुसऱ्या घरी जाऊन दही खाईल. आणखी तिसऱ्या घरी जाऊन लोणी मटकावील. आणखी चवथ्या घरी जाऊन पायसावर हात मारील. आणखी नव्या घरी जाऊन ताकाने भरलेल्या घड्याकडे नजर लावून बसेल ... काय काय सांगू ? आमच्या गौळवाड्याचा (हा) मुखी होईल.

वसुदेव – असेच घडो ! जा आता परत.

नंदगोप – जशी धन्यांची आज्ञा. [जातो.]

वसुदेव – नंदगोप निघून गेलेला दिसतो. तर आपणही आता मथुरेकडे जावे -- (गोल फिरून) रडल्याचा आवाजसा ऐकू येतोय् ... ... कंसाचे भय वाटून नंदगोप तर परतला नसावा? (गोल फिरून) अरे ही मुलगी जिवंत झाली आहे! तर हिला घेऊन देवकीच्या हाती द्यावे आणि दुरात्मा कंसाला धूळ चारावी ! ( मुलीला उचलून घेऊन ) बापरे. चांगलीच जड आहे ! कुमाराहून थोडेसेच कमी असे हे पण दिव्य व्यक्तित्व वाटते. तर आपण सटकावे ( हे बरे). अर, हो देवी यमुना आहे तशीच आहे. (वाट काढून) पुढे जातो. यमुनेच्या पार (तर) पडलो. ही नगराची वेस. मथुरेतील सर्व लोक -सेच गाढ झोपलेले आहेत. तेवढ्यात आत शिरावे. (आत शिरून) हे ते दुरात्मा कंसाचे गृह ...... दुर्भाग्य–देवतेने आसरा घेतल्यासारखे दिसते आहे! हे आमचे निवासस्थान ... ... ... भाग्यलक्ष्मीने निवास केल्यासारख दिसते आहे! तर आता अंतःपुरात प्रवेश करून देवकीला दिलासा देतो. देवांनी (आमचे) कल्याण करावे! [जातो ]

## पहिला अंक पूर्ण.

# अंक २ रा

[आता चांडाल-युवती प्रवेश करतात.]

सर्वजणी – या स्वामी, या आम्हां कन्यांचा तुमच्याशी विवाह होऊ द्या!

[नंतर राजा कंस प्रवेश करतो.]

राजा कंस – अरे, हे आहे तरी काय?

जलतरणाची नौका मोठमोठ्या लाटांवर लाटांनी
इतस्ततः व्हावी
(तशी) पृथ्वी कंप पावते आहे,
भव्य प्रासाद कोसळून पडताहेत,
तर या निमित्तांच्या महत्त्वाच्या गुणांची
आणि कर्मांची फले भोगायला पाहिजेत.
माझ्या पुढे काही संकट उभे आहे?
का हे माझ्या अभ्युदयाचे निमित्त? ॥ १ ॥

सर्वजणी – या स्वामी, या! आम्हां कन्यांचा तुमच्याशी विवाह होऊ द्या!

कंस – (माझे) कोणीही रक्षक ज्याअर्थी गस्त घालीत फिरत
नाहीत
मशाली घेतलेल्या परिचारिका ज्या अर्थी फिरत
नाहीत,
म्हणूनच तर नीलकमल आणि काजळ यांच्यासारख्या
(दिसणाऱ्या या) भयंकर चांडालकन्या
एकजुटीने माझ्या घरात शिरल्या आहेत! ॥ २ ॥

सर्वजणी – या स्वामी, या! आम्हां कन्यांचा तुमच्याशी विवाह होऊ द्या!

कंस – अहो, या चांडालयुवती भलत्याच धीट दिसताहेत –
माझा शत्रुपक्ष (केवळ माझ्या) रागाने नाश
पावतो
सूर्य, चंद्र आणि अग्नी माझ्या अंकित आहेत
जो मी यमाचा यम, भयालाही धडकी भरवणारा
त्या मला (या) अपमानाचे शब्द उच्चारून
धाक दाखवू पाहाताहेत ! ॥ ३ ॥

सर्वजणी – या स्वामी, या !

कंस – चला, तोंड काळे करा! अरे, (या) एकाएकी नाहीश्या झाल्या! तर आपण आता अंतर्गृहात जावे !

[नंतर शाप प्रवेश करतो.]

शाप – हं ... ... ... कुठे शिरशील आता ? हे तर खरे म्हणजे माझे घर झाले आहे !

कंस –
काजळपुंजाच्या वर्णाचा हा कोण
(हाती) पेटत्या मशाली घेऊन
अंतर्गृह ओलांडून
एकाएकी बाहेर पडतो आहे?
भयप्रद, तीक्ष्ण दात असलेले मुख,
सापाच्या सारखे लाल डोळे,
महेश्वराच्या मुखातून (साक्षात) क्रोध जणू
पृथ्वीवर अवतरला आहे ! ॥ ४ ॥

कोण तू?

शाप – मला ओळखत नाहीस वाटते? मी तर मधूक ऋषीचा शाप – वज्रबाहू माझे नाव.

कुरूप, प्रचंड,
मुंडक्यांची माळ आणि अतिशय विचित्र वेष घेतलेला !
चांडालाचे रूप घेऊन,
कंसराजाच्या हृदयात ठाण देण्यासाठी
स्मशानाच्या मध्यभागातून
मी आलो आहे ! ॥ ५ ॥

कंस – अशक्य गोष्ट मागतो आहेस तू !

सोन्याच्या शिखरांचा घनदाट समूह, सुंदर वृक्षवेली
आणि तेजाने झळाळणाऱ्या दऱ्या मिरविणाऱ्या
मेरूला
कावळ्याच्या पंखांची झुळूक
हलवीत नसते!
सुसरी असलेल्या, लाटांच्या माळेने ढवळून निघालेल्या
समुद्राला
हाताची ओंजळ करून पिण्याची इच्छा करतोस
म्हणजे, अरे,
तुला हसावे नाही तर काय ! ॥६॥

शाप – वेळ आली म्हणजे कळेलच तुला.

कंस – हं···· अरे, एकाएकीच नाहीसा झाला ! तेव्हा मी पण आता बिछान्याकडे जातो आणि डोळ्यांना विसावा देतो. [झोपतो.]

शाप – अरे, (हा) झोपी गेला! दारिद्र्य, टकल्या, कालरात्रि, महानिद्रे; पिंगलाक्षि ! तर या, आपण (सारे) अंतर्गृहात शिरू या.

सर्व – असेच करू या.

राजश्री – (प्रवेश करून, नका, आत शिरू नका !

शाप – कोण तुम्ही ?

श्री – मला ओळखत नाहीस का? मी तर याची (राज) लक्ष्मी.

शाप – असे काय ! राजश्री, तुम्ही इथून दूर जा. आता हे घर माझे झाले आहे.

श्री – माझे (हे) घर लंकेसारखे आहे !
मूर्खा,
काहीही विचार न करता,
रात्रीच्या वेळी मला डावलून,
कोणाच्या जीवावर आत शिरतो आहेस ?

पण ही शब्दाशब्दी कशाला?
मी सेविलेल्या या घरावर नजर टाकणे,
प्रवेश करणे,
तुला आज शक्यच नाही ! ॥ ७ ॥

शाप – देवि पद्मालये, कंसाचे शरीर सोडून तुम्ही खरेच दूर जा. विष्णुदेवांची आज्ञा आहे.

श्री – हो? विष्णूंची आज्ञा आहे? अरेरे, दुर्दैव !
दीर्घकाळ सहवासात राहिल्यामुळे
या राजाला सोडून जाणे माझ्या जीवावर आले आहे.
गुणांची ही बळकट लागण
मला फार व्याकूळ करीत आहे ! ॥ ८ ॥
असो- – -- विष्णूंची आज्ञा (तर)मोडता येत नाही. तेव्हा आपणही विष्णूंच्या जवळच जावे. [जाते ]

शाप – राजश्री दूर झाली! आनंदाची गोष्ट ... आता हे आमचे निवासस्थान झाले ! दारिद्र्य, टकल्या, कालरात्रि, महानिद्रे, पिंगलाक्षि! अंतर्गृहात प्रवेश करून आपण आपल्या जातीला साजेसे खेळ खेळू या !

सर्वजण – आजपासून धर्म आणि चारित्र्य तुझ्याजवळ उरणार नाहीत.
नेहमी अधर्म आचरण्यात गुंतलेल्या तुला
मी घट्ट कवेत घेत आहे
(मी) मुनिशाप ... तुला झपाटणार आहे ......
तुझा विनाश लौकरच ओढवेल ! ॥ ९ ॥
[ अंतर्धान पावतो. ]

प्रतिहारी – (प्रवेश करून) महाराजांचा जय हो !
(द्वारपालिका)

कंस – हं ... ...

प्रतिहारी – महाराज, मी आपली यशोधरा —

कंस - यशोधरे, बऱ्याच चांडालस्त्रिया आत शिरल्या, त्या तू पाहिल्या नाहीस ?

प्रतिहारी – काय, चांडालस्त्रियाम्हणालात ? महाराजांच्या चरणतलाजवळ नेहमी असणाऱ्या माणसाला देखील इथे प्रवेश दुर्लभ आहे, मग चांडालस्त्रिया कशा येतील?

कंस – मग मला स्वप्न तर नाही पडले? यशोधरे, आ-कांचुकीय बालाकीला पाठवून दे.

प्रतिहारी – जशी महाराजांची आज्ञा. [जाते.]
[ नंतर कांचुकीय प्रवेश करतो. ]

कंस – आर्य बालाके, आज रात्रीला वातचक्र' भूमिकंप, उल्कापात आणि दैवतांच्या प्रतिमा ( यांचा मला ) स्वप्नाभास झाला ······ त्याचा अर्थ काय, असे राजज्योतिषी आणि पुरोहित यांना विचारून या.

कांचुकीय - महाराज, राजज्योतिषी आणि पुरोहित विज्ञप्ति करतात की,

कंस – काय?

कांचुकीय – ऐकावे –

नभस्तली रहाणारे सनातन भूत (तत्त्व)
काही विशेष कार्यासाठी इथे या नरलोकावर
अवतार घेत असते, महाराज!
आकाशदुंदुभीच्या घोषांनी आणि भूमिकंपाने
त्यांच्या अवतारवेळी
हा विशेष प्रकटविणारा परिणाम (घडून येतो) ॥ १० ॥

कंस – कोणाचा जन्म झाला म्हणून
श्रेष्ठ पर्वतांसह ही पृथिवी कंपित झाली?
कोणाचा हा पुत्र?
आणि त्याच्या जन्माचे प्रयोजन काय?
(ते) माहीत करून घ्या. ॥ ११ ॥

असे (मला विचारायचे आहे).

कांचुकीय – जशी महाराजांची आज्ञा. (बाहेर जाऊन पुन्हा आत येत) महाराजांचा जय हो! बातमी आहे की देवकी प्रसूत झाली.

कंस – कोणाला जन्म दिला ?

कांचुकीय – मुलगी झाली.

कंस – काहीतरीच काय सांगता? ही महानिमित्ते केवळ मुलगी जन्माला आल्यानं उत्पन्न होतात?

कांचुकीय – कृपा असावी, महाराज! मी कधीही खोटे बोललेलो नाही. आपल्या परिचारकांनी वेढलेल्या दाईच्या हाती मी ती (मुलगी) (प्रत्यक्ष) पाहिली.

कंस – कदाचित असे असेल ... ब्राह्मणाचे बोल असत्य असले तरी मला सत्य वाटतात! जा, वसुदेवाला बोलावणे पाठवा.

कांचुकीय – जशी महाराजांची आज्ञा. [जातो.]

कंस – वसुदेव धर्मशील आहे. सत्यवचनी आहे. आणि शिवाय, माझ्या समोर तो खोटे बोलणार नाही. ठीक आहे, ऐकूच या.
[मग वसुदेव प्रवेश करतो.]

वसुदेव – सहा पुत्रांचा नाश अनुभवल्यावर,
दु:खांनी वाळून गेलेले हे शरीर ढकलीत,
निर्दय राजाचे बोलावणे येताच, गुलामीत पडलेल्या चाकराप्रमाणे
मी जातो आहे! ।। १२ ।।
अहो, अशीच ही जगरहाटी –
(राजाची) आठवण झाली की भय वाटते,
विसर पडला की (क्षणभर) भय जाते ... ...
भय आणि अभय अशा दोन्ही (अवस्था) पैकी काहीही असले तरी
बोलावण्याप्रमाणे राजाकडे जाणे भाग पडतेच. ।।१३।।
(जवळ जाऊन) शौरसेनीपुत्र, मी (आलो) आहे.

कंस – यादवीपुत्रा, बसा.

वसुदेव – ठीक आहे. (बसून) शौरसेनीपुत्र, आम्हाला कशासाठी बोलावले?

कंस – यादवीपुत्रा, मी ऐकले की देवकी प्रसूत झाली.

वसुदेव – होय, प्रसूत झाली.

कंस – काय झाले?

वसुदेव – (स्वतःशी) माझ्यासारख्यालाही खोटे बोलण्याची वेळ येणार आहे. पण कुमाराचे रक्षण करण्यासाठी खोटेसुद्धा खरेच म्हणावे. मी काय बरे करावे ? हां …… अवघड आहे. ( प्रकटपणे ) तिला मुलगी झाली.

कंस – मुलगी असो, नाहीतर मुलगा असो ……

काही झाले तरी मला (त्याला) मारून टाकलेच पाहिजे.
माझ्या पराक्रमाने
मी दैवावर मात करणार आहे… निश्चित ! ॥१४॥

प्रतिहारी – ( प्रवेश करून ) महाराजांचा जय हो ! आमच्या स्वामिनींची विनंती आहे की, मुलगी आहे, बाळ आहे, हे लक्षात घेऊन महाराजांनी दया करावी.

वसुदेव -- शौरसेनीपुत्रा, बिचाऱ्या देवकीच्या बोलाला मान द्यावा. मुलीवर बापकांचे फार फार प्रेम असते.

कंस – आपल्याला करार आठवतो आहे ना ?

मधूक ऋषींचा शाप ऐकल्यावर,
' देवकीने धारण केलेले गर्भ
मी तुमच्या हाती देईन'
असा करार तुम्ही तेव्हा केला होता. ॥१५॥

वसुदेव -- करार म्हणता ? हे मी तोंडाला कुलूप घातले.

प्रतिहारी -- स्वामी, आमच्या स्वामिनीला काय सांगू ?

कंस -- यशोधरे, देवकीला सांग … की आता काही आग्रहाचे बोलणे योग्य नाही. मी ( तिचे ) दुसरे काहीतरी प्रिय करीन.

प्रतिहारी – जशी स्वामींची आज्ञा.

कंस – यशोधरे, असे कर [ कानात काहीतरी सांगतो. ]

प्रतिहारी – स्वामींनी स्वस्थ असावे.

वसुदेव - [स्वगत] विवेकाची इच्छा मी बाळगून असतो ... तरी पण एक परक्याचे मूल मरणाच्या ( दारी ) नेण्याची ( पाळी ) माझ्यावर आली आहे. का ... कुमारलाच आणून याच्या हवाली करू? पण –

ही मुलगी अगोदरच मेलेली होती,
पुन्हा जिवंत होऊन आली ......
या बालकाच्या महात्म्यामुळे
हिचा नाश होणार नाही
( असा मला विश्वास आहे. ) ॥१६॥

आपण आता देवकीकडे जाऊन तिला धीर द्यावा. [जातो.]

कंस - यशोधरे, त्या मुलीला घेऊन ये.

प्रतिहारी – जशी स्वामींची आज्ञा. [जाते]

( नंतर मुलीला घेऊन दाई आणि रक्षक प्रवेश करतात. )

सर्व रक्षक - सावकाश, सावकाश, आर्या! हे मधले दार आत चला, आर्या.

दाई – ( प्रवेशून )स्वामींचा जय हो! आम्ही या मुलीचा खूप वेळ सांभाळ केला आहे.

कंस – अहो, राज-( कुलातल्यासारखी ) देखणी आहे ही मुलगी! स्त्रीवध करण्याची पाळी माझ्यावरही आली म्हणायची!

दाई – सावकाश, स्वामी, सावकाश!

कंस – ही कंसशिळा...... आता ( धीर धरून ) मला साहस केले पाहिजे.

ऋषी-शापाच्या सामर्थ्यामुळे उत्पन्न झालेला
हाच सातवा गर्भ ......
या गर्भाचा एकदा नाश झाला
म्हणजे मला शांती लाभेल! ॥१७॥

( बालिकेला उचलून शिळेवर आपटीत ) अरे!

( हिचा ) एक अंश पृथ्वीवर पडला,
एक अंश आकाशात वर चढला आहे ......
तळपणारी शस्त्रे घेतलेल्या हातांनी
माझ्यावर प्रहार करण्यासाठी
इथे उत्पन्न झाला आहे! ॥१८॥

अरे, ही तर आता------

तीक्ष्ण टोकाचा शूल हाती घेऊन
रौद्रवेष धारण करून
हुंकार देते आहे ... ...
विनाशकाळ येऊन ठेपल्यासारखी
काळरात्रीप्रमाणे उभी ठाकली आहे ! ॥१९॥

[ नंतर परिवारासह **कात्यायनीचा** प्रवेश ]

**कात्यायनी** - सुंभ, निसुंभ आणि महिष यांचा वध करून,
देवांच्या सर्व शत्रुवर्गाचा संहार करून,
कंसकुलाचा नाश करण्यासाठी
मी कात्यायनी–
वसुदेवाच्या वंशात जन्मास आल्ये आहे. ॥२०॥

**कुण्डोदर** – मी कुंडोदर (नामक सर्प)–
मला कोणी जिंकू शकत नाही ...
युद्धभूमीवर मी भीषण कर्म करतो...
देवी (कात्यायनी) च्या अवतारसमयी
उत्पन्न झालेला, कानठळ्या बसविणारा, प्रचंड नाद
तो मी –
पराक्रमाचा फार गर्व झालेल्या, ताठर
असुरांना ठार करण्यासाठी
आकाशातून (या) विशाल पृथिवीकडे
मी त्वरेने निघालो आहे! ॥२१॥

**शूल** – मी शूल –
पृथ्वीवर अवतरलेली अदृश्य शक्ती...
देवी (कात्यायनी) च्या कृपेमुळे
(हा) झगझगीत सुंदर वेष मला मिळाला आहे–
कार्त्तिकेयाने समुद्रात
(वृक्षाप्रमाणे) दृढमूल झालेल्या (तारकासुराला)
जसे खेचून काढले
तसे कंसाला मारून मी खेचणार आहे ! ॥२२॥

**नील** – मी तर नील –
मी भांडणे लावतो
संग्रामात (माझ्यासारखा) पराक्रमी (नाही)
युद्धात मी पाठ दाखविली नाही ..

शक्तीशाली (स्कंदाने) क्रौंच (पर्वता) चा जसा भेद केला
तसे दुष्ट कंसाला युद्धात मी ठार मारणार आहे! ॥ २३ ॥

**मनोजव –** (मी) मनोजव –
माझा वेग वाऱ्यासारखा आहे.
देवी (कात्यायनी) च्या कार्यसिद्धीसाठी मी इथे आलो आहे ...
वेळूच्या वनाची अग्नी (जशी अवस्था करतो)
तशी युद्धाच्या आघाडीवर
मी दैत्यांची करतो! ॥ २४ ॥

**कात्यायनी –** कुंडोदर, शंकुकर्ण, महानील, मनोजव! तर या भगवान विष्णूच्या बाळलीलांचा आस्वाद घेण्यासाठी, गवळ्यांच्या वेषात स्वतःला लपवून आपण (सारे) गौळवाड्यातच उतरू या.

परिवारासह [कात्यायनी जाते.]

**(राजा) कंस –** अरे, पहाट झाली...
तर शांतिकर्माला योग्य अशा कक्षात
शांतीसाठी जाऊन-------
मी खूपसे शांति (कर्म) करतो
(म्हणजे) मला शांती लाभेल. ॥ २५ ॥

[सर्वजण जातात.]

## दुसरा अंक पूर्ण

# अंक तिसरा

## ( प्रवेशक )

[एक वृद्ध गोपालक प्रवेश करतो.]

वृद्ध गोपालक – अरे मेघदत्त, हे पाहा वृषभदत्त, ए कुंभदत्त, तू घोषदत्त, तुम्हांला सांगतोय् – – – – गाईवासरांना पुढे हाका, पुढे हाका ! पोटभर पाणी पिऊन गाईवासरं हंबरत हंबरत या वृंदावनाकडे येताहेत. आणि (हा) गाईंच्या कळपातून बाहेर पडून वारुळाला तळापासून उकरीत काळसर रंगाच्या सापांसारख्या निळ्याकमळांच्या माळांचा (देठांचा) शिगांवर वेढा पडलेला बैल ऐटीत उभा आहे! आणि हा कोणी वेगळाच बैल वाटतोय्– – – – शेपूट उंचावून पसरली आहे, खांदे आक्रसून घेतले आहेत, चंद्रासारखं पाढरं अंग आहे. शिगांच्या टोकांनी जणू जमीन उकरून मस्तीत फेकतो आहे! मी आपला दामकालाच हाक मारतो. अरे दामक, आपल्या लाडक्या गाईंना आणि वासरांना सुरक्षित जागी हलव आणि तू पण (इकडे) ये.

[ मग दामक प्रवेश करतो. ]

दामक – अहाहा, स्वामी नंदगोपांची केवढी मोठी गवताची शिवारं आहेत ! (त्यांच्या) मुलाचा जन्म झाला त्या दिवसापासून (तर) खूप खूप आनंदाच्या अद्‌भुत गोष्टींची भर पडते आहे! बरं तर, गाईंचं खिल्लार इथंच थांबू दे — तेवढ्यात मी मामांच्याकडे जातो. (जवळ जाऊन) मामा, दंडवत.

वृद्ध गोपालक – शांती असो, शांती असो, आम्हांला आणि आमच्या गोधनाला !

दामक – मामा, नंदगोपांना मुलगा झाला तेव्हापासून आमच्या गाईवासरांचा रोग पळून गेला आहे. खरं म्हणजे सगळ्याच गवळी लोकांमध्ये प्रेमाची भावना वाढली आहे – – – आणखी पाहा ना – – – खणावं तिथं मुळं तग धरताहेत, झुडपाझुडपांवर फळं लगडलीत... गोड दूध तर किती दोहलं जातंय् – – – आणि तेवढंच तूप!

वृद्ध गोपालक – आणि ही चकित करून टाकणारी गोष्ट ... नंदगोपांचा बाळ जन्मून दहा रात्री झाल्या तेवढ्यात पूतना नावाची राक्षसी स्तनांत विष भरून, नंदगोपीचं रूप घेऊन आली. मग तिनं बाळाला घेऊन त्याच्या तोंडात स्तन दिला. तेव्हा त्यानं तिला ओळखलं, जमिनीवर झोपल्यासारखी तिला पाडली, तर ती राक्षसी झाली आणि तिथंच मरून गेली ! मग नंदगोपांचा बाळ जेमतेम महिन्याचा झाला तेव्हा शकट नावाचा राक्षस शकटाचं–गाडीचं रूप घेऊन आला. त्यालाही (बाळानं) ओळखलं आणि एक लाथ हाणून त्याचा चुराडा केला-- तोही पुन्हा राक्षस होऊन जागीच मरून पडला ! मग महिना उलटून गेल्यावर नंदगोपाच्या बाळाचा (हा उद्योग) --- एका घरी जाऊन दूध प्यावं, दुसऱ्या घरी जाऊन दही खाऊन टाकावं आणखी तिसऱ्या घरी जाऊन लोणी गिळावं, चौथ्या घरी जाऊन पायसा (खिरी) वर हात मारावा, आणखी कुठल्या घरी जाऊन ताकाच्या घड्याकडे पाहात रहावं ... ... तेव्हा तरुण गवळणींनी रागावून नंदगोपीकडे ( सगळं ) सांगितलं. नंदगोपी रागावली, एक दोरी घेऊन तिनं ती ( बाळाच्या ) कमरेला बांधली आणि उरलेलं टोक उखळाभोवती बांधलं. आणि मग ते उखळसुद्धा ओढून आणताना पाहून, यमल आणि अर्जुन या दोघा राक्षसांनी मधं अडकवलं. ते दोघे (जवळ येऊन) एक झाले. त्यांच्या मधून जाताना नंदगोपाच्या बाळानं जोर केला आणि दोन्ही झाडांचा चक्काचूर केला– - - – तेव्हा ते (वृक्ष) पण राक्षस झाले आणि लगेच मरून पडले ! तेव्हा मग सगळे गवळी लोक म्हणाले, 'हा प्रचंड शक्तीचा, पराक्रमी आहे- - - - आजपासून याला धनी दामोदर म्हणू या?' मग नंदगोपांचा बाळ इकडे तिकडे धावण्या-इतका (मोठा) होतो तोच प्रलंब नावाचा राक्षस नंदगोपांचा वेष घेऊन आला. मग संकर्षणाला गळपाणी घेऊन तो जाऊ लागला तेव्हा धनी संकर्षणानं त्याच्या डोक्यावर मूठ हाणली. त्या दणक्यानं त्याचे डोळे बाहेर आले, तोही राक्षसरूपात आला आणि लगेच मेला ! मग (नंदबाळ) गवळ्यांची पोरं बरोबर घेऊन ताडफळं जमविण्यासाठी तालवनाकडे गेला. तिथं तालवनात धेनुक नावाचा राक्षस गर्दभाचा वेष घेऊन आला. त्यालाही धनी दामोदरानं ओळखलं, त्याचा डावा पाय पकडून त्याला वर फेकलं, ताडफळं खाली पाडून घेतली. तोही राक्षसरूपात आला आणि लगेच मेला ! मग केशी नावाचा राक्षस घोड्याचं रूप घेऊन आला. धनी दामो-दरानं त्याला पण ओळखलं, त्याच्या तोंडात हाताचा कोपर घातला, त्यामुळे त्याचे दोन तुकडे झाले. तोही राक्षसरूपात येऊन जागीच

मेला! ही आणि आणखी कितीतरी (पराक्रमाची) कृत्यं धनी दामोदरानं केली आहेत!

दामक – मामा, ते सारं आता राहू द्या. धनी दामोदर आज या वृंदावनात गोपकन्यांना बरोबर घेऊन हल्लीसक खेळायला येताहेत.

वृद्ध गोपालक – हो का? तर सर्व गोपजनांसह धनी दामोदराचं हल्लीसक आपण पाहू या.

दामक – जशी मामांची आज्ञा. [दोघे जातात.]

## [ अंकारंभ ]

वृद्धगोपालक – सूर्य उगवला न उगवला तोच
सर्वादरानं मस्तक (नमवून)
दुग्धामृतानं भरलेल्या जगन्मातांना
(या आपल्या) गाईंना नेहमी वंदन करीत चला ! ॥१॥

अहो, आमच्या घरादारांची ( केवढी हो ) श्रीमंती ! ऐटीत तयार होऊन, रूपाला साजेसा वेष लेऊन (आणि) दुंदुभि (वगैरे घेऊन) आम्ही बोलावणे करायला चाललो आहोत - - - आमच्या गोपकन्यांनो, ए घोषसुंदरि, वनमाले, चंद्ररेखे, मृगाक्षि, या, अवालव या !

[मग सर्वजणी येतात.]

सर्वजणी – मामा, आमचा सर्वांचा दंडवत.

वृद्ध गोपालक – मुलींनो, हा (पाहा) धनी दामोदर, गाईच्या दुधानं पांढरा झालेल्या धनी संकर्षणाबरोबर, गोपाळांच्या घोळक्यात, मुहेत असलेल्या सिंहासारखा इकडेच येतो आहे.
[नंतर गोपाळांनी वेढलेला दामोदर आणि संकर्षण प्रवेश करतात.]

दामोदर – (चकित होऊन) अहाहा, जात्याच सुंदर असलेल्या या गोपकन्यांनी (आज) ठेवणीतला पोशाख चढविला आहे. !
या गोपस्त्रिया
सोनचाफ्याच्या फुलासारख्या गौरवर्णी आहेत...

फुललेल्या कमलासारखा त्यांचा चेहरा
(आणि) नीलकमलासारखे त्यांचे डोळे आहेत ..
विविध रंगीबेरंगी वस्त्रे नेसून,
लांबसडक केसांत भरगच्च रानफुले माळून,
गोड बडबड करीत
त्यांचा खेळ चालू आहे ! ॥ २ ॥

संकर्षण – हे गोपयुवक आले आहेत :
खूप आनंदित होऊन
रंगीत (कापडाने मढविलेले, हालचालीबरोबर) हलणारे
ढोल वाजवीत काहीजण उभे आहेत;
तर लालकमलाच्या पाकळ्याप्रमाणे चेहरा आणि डोळे
असलेले काही नाना प्रकारचे खेळ खेळताहेत;
(गाईवासरांच्या) हंबरण्याच्या आवाजाने भरलेल्या
वृंदावनातील (या) गौळवाड्याला
प्रचंड आनंदाची जाग (आली आहे);
तशाच आनंदाने भरलेले काही (गोपतरुण)
गाणी म्हणत आहेत. ॥ ३ ॥

वृद्ध गोपालक – होय, धनी, सर्व तयारीनं आले आहेत.

दामक -- स्वामींचा जय हो !

संकर्षण -- दामक, सगळी गवळ्यांची मुले आली आहेत ?

दामक -- होय, धनी. सर्व तयारीनं आले आहेत.

दामोदर -- घोषसुंदरि, वनमाले, चंद्ररेखे, मृगाक्षि? हा हल्लीसक नृत्याचा प्रकार गौळवाड्याला अनुरूप (आहे, तर तो) नाचावा,

सर्वजणी -- जशी स्वामींची आज्ञा.

संकर्षण -- दामक, मेघनाद, वाद्ये वाजवायला आरंभ करा.

दोघेही -- धनी, तसंच करतो.

वृद्ध गोपालक – धनी, तुम्ही हल्लीसक खेळाल. मी इथं काय करू ?

दामोदर – का ? तुम्ही पाहा ना !

वृद्ध गोपालक – बरं, धनी !

[सर्वजण नृत्य करतात.]

वृध्द गोपालक – वा: वा:, छान गायलात, छान वाजवलंत, छान नाचलात ! तर मी सुध्दा नाचतो... ... अरे, धाप लागली की मला !

(एक) गोपाळ – (प्रवेश करून) बापरे, धनी, पळा या जागेतून !

दामोदर -- दामका, असा घाबरला आहेस का ?

गोपाळ – हा ... ... अरिष्ट वृषभ नावाचा राक्षस .... प्राणघेण्या विनाशाचा गोळा (जणू) ...खुराच्या टोकांनी जमीन उकरीत...त्याची डरकाळी म्हणजे ढगांचा गडगडाट.. म्हणून मी घाबरलो आहे !

दामोदर – अस्सं, म्हणजे अरिष्टर्षभ आला म्हणायचा ! (हे पाहा), या आपल्या गोपकन्या आणि मुले (यांना) घेऊन या पर्वतशिखरावर चढून जावे (आणि तिथून) या दुष्टाचे आणि माझे जे खास युध्द (होईल) ते आपण पाहावे ह्याचा गर्व मी उतरवतो.

[संकर्षण त्या सर्वांच्या बरोबर जातो ]

दामोदर – हाच, हाच तो दुष्ट अरिष्टर्षभ –
हा शक्तिशाली वृषभराज :
जमिनीचा पृष्ठभाग खुरांनी पुरापुरा ओरबाडून
शिंगांनी नद्यांचे बांध फोडून (माती) चहूकडे उधळीत,
भीतीने कावरेबावरे झालेले गोप एकटक पाहात असता,
गर्जना करीत(इकडे) धावतो आहे! ॥४॥

[मग अरिष्टर्षभ प्रवेश करतो.]

अरिष्टर्षभ – अहो बघा –
शत्रूचा वध करण्यासाठी बैलाचे रूप घेऊन,
शिंगांच्या टोकापासून पसरणाऱ्या कोटी किरणांनी
जणू आकाश रंगवीत,
वृंदावनात मजेने आरोळ्या ठोकणाऱ्या
(या) शत्रूवर हल्ला करून

आज पासून मी सुखानें कालक्रमणा करणार आहे ! ॥५॥

माझ्या गर्जनेच्या आवाजाने इथे या गौळवाड्यात

स्त्रियांचे गर्भ गळून पडतात...

खुरांची टोके रुपून अर्धचंद्राकृती उमटलेली भूमी

वृक्ष–अरण्यासह थरथर कापते ! ॥६॥

कुठे गेला आहे, तो नंदगोपाचा पोर? अरे, नंदगोपाच्या पोरा, कुठे आहेस तू?

दामोदर – अरे नीचा, वृषभा ! इकडे ये, इकडे ये. हा मी इथे उभा आहे.

अरिष्टर्षभ – (पाहून) अहो,

(माझ्यासारख्या) भयंकर रुप असलेल्या,

प्रचंड गरजणाऱ्या,

प्रचंड शक्तीच्या (अरिष्टर्षभाला) पाहून

याला भीती वाटत नाही, आश्चर्य वाटत नाही ...

म्हणजे हा पोर फारच सामर्थ्यवान (असला पाहिजे) ! ॥७॥

दामोदर – अरे, हे भय म्हणजे काय आहे ?

तुमच्याकडून मी आज (हे प्रथमच) ऐकले !

(खरे म्हणजे) भ्यालेल्यांना अभय देण्यासाठी (तर)

मी या पृथ्वीतलावर जन्म घेतला आहे. ॥८॥

अरिष्टर्षभ – अरे, तू पोर आहेस. म्हणून तुला भय (म्हणजे काय ते) माहीत नाही.

दामोदर – अरे नीच वृषभा, पोर म्हणून माझ्याशी दांडगाई करतोस ?

कृष्णसर्पाच्या पिलाने चावा घेतला

म्हणून कोणी मरत नाही?

प्राचीन काळी, कुमार स्कंदानेच

क्रौंचाचा संहार केला होता ! ॥९॥

अरिष्टर्षभ – असेल !

दामोदर – मूर्खा, आणखी हे पण ऐकून ठेव :

घट्ट दगडांच्या राशीसारखा तू (असशील) ;

पण फांदीसारख्या केवळ वज्राने
पर्वताला खाली कोसळवले की नाही? ॥१०॥

अरिष्टर्षभ – अरे, नंदगोपाच्या पोरा, काय आरंभले आहेस तू ?

दामोदर – तुला ठार करण्याचा उद्योग.

अरिष्टर्षभ – आहे ताकद?

दामोदर – संशय वाटतो की काय?

अरिष्टर्षभ – तर मग, तुझ्या जातीला शोभेल असे शस्त्र (हाती) घे.

दामोदर – शस्त्र म्हणालास? हा, हा ! अरे,
पर्वताच्या कड्यासारखे घट्ट खांद्याचे
हे माझे दोन हात (हेच) माझे शस्त्र !
तुझ्यासारख्या दुबळ्यांनी दुसरे शस्त्र (घ्यावे).
आणखी (सांगतो) –
माझ्या लांब आणि घट्ट बाहूंनी चेचून जात
तू चटदिशी जमिनीवर कोसळला नाहीस
तर माझे नाव 'दामोदर' नाही ! ॥११॥

अरिष्टर्षभ – ठीक तर...कर लढायला सुरुवात.

दामोदर – अरे नीच वृषभा, तुझ्यात ताकद असेल तर ... मी एका पायावर उभा रहातो ... (या) जागेवरून ढकल मला.

अरिष्टर्षभ – यात काय संशय !
[ तसे करण्याची धडपड करून मूच्छित होऊन पडतो. ]

दामोदर – अरे बैला, शुद्धीवर ये, शुद्धीवर ये ! या ताकदीचाच तुला गर्व झाला होता?

अरिष्टर्षभ -- (शुद्धीवर येऊन, स्वतःशी) अरे, या पोराला प्रतिकार करणे महाकर्म कठीण !

हा रुद्र असेल काय? का इंद्र ?
का स्वत: विष्णूच असावा?
माझा तर्क काही खोटा नाही
तो पुरुषोत्तमच हा ! ॥१२॥

आः ...

जिथे जिथे आम्ही जन्म घेतला
तिथे तिथे दानवांचा वध करण्यास्तव
त्रैलोक्याचा संरक्षक
मधुसूदन प्रकट होतो! ॥१३॥

असो! विष्णूच्या हातून मेलो तर मला अक्षय लोक मिळेल ! तेव्हा मी युद्धच करणार (उघडपणे)अरे नंदगोपाच्या पोरा माझा गर्व पुन्हा उफाळून आला आहे !

दामोदर – हं .......... थांब, थांब तर मग
माजलेल्या बैला,
माझ्या हातांच्या मिठीत सापडलास म्हणजे,
पडण्यासाठीच फुगलेल्या पावसाळी ढगासारखा
गरजशील काय ?
ये, (तुला) फेकतो (बघ)............
जमिनीवर (उताणा) पडशील........
वज्राने छिन्नभिन्न झालेल्या अंजनपर्वताच्या
कड्यासारखा (होशील) ! ॥१४॥

(तसे करून) हा दुष्ट अरिष्टर्षभ –
वाहणाऱ्या रक्ताच्या चिळकांड्यांनी
त्याचे नाक, तोंड, डोळे ओले झाले आहेत,
त्याच्या वशिंडावरचे केस ताठरले आहेत,
पाय आणि कान थरथरताहेत !
हा शक्तिशाली राक्षस .......... वृषभ,
वज्राने चक्काचूर झालेल्या पर्वताप्रमाणे
अणकुचीदार शिखरांसहित
जमिनीवर कोसळला आहे ..........
(त्याचे) प्राण निघून गेले आहेत ! ॥१५॥

दामक – (प्रवेश करून) स्वामींचा जय हो ! इकडे, यमुनेच्या डोहात कालिय नावाचा महानाग वर आला आहे असे एकून धनी संकर्षण

पर्वतावरून तिकडेच गेले आहेत! धनी, संकर्षणांना आवरा आवरा!

दामोदर – कालिय नावाचा नागराज फार गर्विष्ठ असल्याचे मी पण ऐकतो आहे. ठीक आहे...... मी त्याचा गर्व जिरवतो.

गाई, ब्राह्मण इत्यादी प्रजेला
त्याने फार इजा केली आहे.
आजपासून त्याचा प्रभाव लोपेल ......
त्याचा आत्मा थंड होईल! ॥ १६ ॥

[ दोघे जातात ]

## तिसरा अंक पूर्ण झाला.

# अंक ४ था

[ आता दामोदर प्रवेश करतो ]

**दामोदर** – या रमणीय गोपांगना –
मत्त चकोरपिलांच्यासारखे त्यांचे डोळे,
उन्नत आणि कमनीय स्तन,
थरारणाऱ्या अधरोष्ठाचा चमक,
नागराजाला पाहून त्या घाबरून गेल्या आहेत,
बावचळल्या आहेत,
केसात खोवलेल्या त्यांच्या फुलांच्या माळा
विसकटून गेल्या आहेत,
उत्तरीय (खांद्यावरून) गळून पडले आहे,
भीतीने व्याकूळ होऊन (काहीबाही) बोलत आहेत,
(आणि याच स्थितीत)
माझ्या मागून येत आहेत. ॥ १ ॥
[मग गोपकन्या प्रवेश करतात]

**सर्वजणी** - नका, नका, धनी! या जलाशयात प्रवेश करू नका! हा तर दुष्ट महानागाच्या कुळाचं निवासस्थान आहे!

**दामोदर** - छे...... छे...... तुम्ही काहीही विषाद बाळगू नका. असे पहा–
हा समुद्रासारखा तेलकट पाण्याचा डोह.........
पक्षी आणि वध्य पशु तो टाळतात,
याच्या पाण्याची खोली (खूप असल्यामुळे) हत्तींचे कळप भीतीने चकित होऊन
(याकडे) दुरून पाहात रहातात;
गोपींनी शंका (आणि भीति) वाटल्यामुळे
गोड नाजूक हितकर बोलांनी मला अडविले (तरी)
त्यात शिरून मी तो ढवळून टाकतो.........
(आणि) कालिंदी (च्या डोहात) रहायला चटावलेल्या

अतिशय शक्तीमान सापाला
युद्धाची चुणूक दाखवितो! ॥ २ ॥

सर्वजणी – धनी संकर्षण, आवरा, आवरा धनी दामोदराला !

संकर्षण – (प्रवेश करून) भीती किंवा विषाद वाटण्याचे मुळीच कारण नाही. ( दामोदराविषयीचे तुमचे ) प्रेम दिसून आले आहे (च). तुम्ही असे पाहा की,

ज्याच्या मुखातून बाहेर पडणाऱ्या
अशुभ विषयुक्त अग्निज्वाळांनी
दिशांचे मंडळ रक्ताळले आहे,
तो हा प्रचंड नाग
येणाऱ्या कृष्णाला पाहून दचकून,
वेगाने चाल करून
फणांच्या आत (आपले) मस्तक नमवीत आहे ! ॥ ३ ॥

सर्वजणी – हो...... (आमचे) धनी दामोदर आहेतच मुळी तसे.

दामोदर – सर्व प्रजेच्या कल्याणास्तव मी नागाला अतिशय झपाट्याने माझ्या काबूत आणतो.

[असे म्हणून डोहात शिरतो.]

सर्वजणी – अगबाई ! धुराचा लोट उसळला !

दामोदर – अहो, किती खोल हा डोह ! इथे

कालियाच्या धुराने धूसरित झालेल्या,
विषारी अग्नी पोटात असलेल्या
या यमुनेच्या लाटांना
काळ्या चुण्या पडलेल्या रेशमी वस्त्रांची कांती चढवितो
(आणि) प्रवाही इंद्रनील मण्यांचे सादृश्य आणतो. ॥४॥

[जातो.]

[ नंतर वृध्द गोपालक प्रवेश करतो ]

वृद्ध गोपालक– धनी, धनी ! बघा, मुली अडवीत असताना (ही) हा यमुनेच्या डोहात शिरला ! नको, नको, असं साहस करून शिरायला नको होतं. या डोहात वाघ, डुकरं, हत्ती पाणी पिऊन जागच्या जागी

मरून पडतात. (हा तर) डोळयांनाही दिसत नाही! आता मी काय करू ? बरं ······ या कुंभपळसावर चढून नजर रोखून पाहातो. बापरे ! धूर उसळला !

संकर्षण – बघा मुलींनो –
तळापासून पाणी ढवळून,
नागाला चहुबाजूंनी पकडून,
या नील (कृष्ण) सर्पाच्या फण्यावर
हा दामोदर उभा आहे
(आणि) मेघावर आरूढ झालेल्या
इंद्रासारखा शोभतो आहे !

वृध्द गोपालक– वा: वा:, शाबास धनी, शाबास !
[नंतर कालियाला पकडून **दामोदर** प्रवेश करतो.]

दामोदर – अरे, हा मी –
विषाने फुगलेल्या फणा असलेल्या,
(रागाने) थरथरत असलेल्या
कालिय महासर्पाला अपमानित करून,
त्याच्या मस्तकावर एक पाय रेलून,
हात पताकासारखे फडफडवीत,
त्याच्या फणांवर
नाजूक अंगविक्षेपासह सुंदर हल्लीसक नाचतो आहे ! ।।६।।

सर्वजणी – नवल आहे, धनी, नवल आहे ! कालियाच्या पाची फणांवर चढून हल्लीसक नाचताहेत !

दामोदर – तर मी पण आता फुले गोळा करतो.

कालिय – विश्वाचा प्रचंड विस्तार
प्रकाशमान आणि अंधारित जगांना (विभागणाऱ्या)
पर्वताने ज्याप्रमाणे वेढला,
आणि समुद्रिय राक्षसांच्या निवासस्थानात (समुद्रात)
शर्वधनुष्याच्या दोरीसारख्या (वासुकी) सर्पाने
मंदर पर्वताला जसे वेढले,
त्याप्रमाणे इंद्राच्या हत्तीच्या सोंडेप्रमाणे

जाडजूड आणि टणक असा मी (माझ्या) फणांनी
तुला पुरापुरा आवळून क्षणार्धात
स्वर्गात कायमचा रहाण्यासाठी पाठवतो (बघ)! ॥ ७ ॥

वृद्ध गोपालक– अहो, अहो, धनी ! हा बघा धनी दामोदर फुलांच्या सारखी पावलं टाकीत, यमुनेच्या डोहाचाच आकार घेतलेल्या महानागाला पायानं हाणीत, फुलं गोळा करतो आहे ! (पाण्याजवळ उतरून) शाबास, धनी, शाबास ! फाडून टाक, फाडून टाक (त्याला). मी पण मदतीला येतो ! पण धनी, मला भीती वाटते. तर मी ही हकीकत नंदगोपांना (जाऊन) सांगतो.

[ जातो ]

दामोदर – अतिशय गर्व चढून
जोरजोराने फूत्कार टाकीत असलेल्या,
लांबरुंद, गोलाकार फणा पसरलेल्या
या गढूळलेल्या सापाला
यमुनेच्या डोहाच्या तळापासून –
जिथले मासे आणि सुसरी रगडून गेले आहेत –
बाहेर खेचून
मी एकदम जमिनीवर आपटतो (बघा) ! ॥ ८ ॥

कालिय – अरे ए,
ज्याच्या (केवळ) रागाने शरिरातून धूर निघू लागतो,
त्यानेच पृथिवी आगीचे भक्ष्य होते,
तो मी–ज्वालांच्या वेटोळ्यांनी (तुला) जाळून टाकतो...
मरुद्गणांसह (सारे) लोक
तुझे रक्षण करोत ! ॥९ ॥

दामोदर – कालिय, तुझी ताकद असेल तर माझा एक हात जाळून दाखव!

कालिय – हा हा हा !
चार समुद्रांपर्यंत पसरलेली
सात कुलपर्वतांसहित ही अखिल पृथिवी
मी जाळीन...
तर तुझा हात मी जाळू शकणार नाही ? ॥१०॥
हं... उभा रहा आता. तुझी राख करून टाकतो बघ.

[ विषमय अग्नी सोडतो. ]

दामोदर – वा:, दिसला की तुझा पराक्रम!

कालिय – देवा नारायणा, प्रसन्न व्हा, प्रसन्न व्हा!

दामोदर – या पराक्रमाचा (च) तुला गर्व चढला होता?

कालिय – क्षमा करा, देवा!

देवश्रेष्ठा,
गोवर्धन उचलून धरणारा
अतुलनीय प्रभाव असलेला
मंदार (पर्वता) सारखा शक्तिशाली
अलौकिक पराक्रमी तुमचा हा बाहू–
ज्याचा आसरा सर्व जगे घेतात–
तो जाळण्याची,
हे त्रिभुवनेश्वरा!
माझ्यात कशी ताकद असणार? ॥ ११ ॥

भगवन्, अज्ञानामुळे माझ्याकडून अतिक्रमण झाले. अंत:पुरासह मी (आपल्याला) शरण येत आहे.

दामोदर – कालिय, या यमुनेच्या डोहात तू का आलास?

कालिय – भगवंताच्या श्रेष्ठ वाहनाची, गरुडाची भीती आहे म्हणून मी (या डोहात) शिरलो. तर भगवंताच्या कृपेने गरुडापासून अभयाची इच्छा करतो.

दामोदर – बरे, बरे.

नागेंद्रा, तुझ्या मस्तकावर
माझ्या पावलाची खूण वठली आहे.
ही गरुडालाच दिसेल.
(आणि) तो तुला अभय देईल. ॥ १२ ॥

कालिय – भगवंताचा अनुग्रह झाला.

दामोदर – जा, (डोहात) प्रवेश कर.

कालिय – जशी भगवान नारायणांची आज्ञा.

दामोदर – नाही तर ...... जरा इकडे ये.

कालिय – हा आलो, भगवन् !

दामोदर – आजपासून गाई, ब्राह्मण प्रभृती सर्व प्रजाजनांच्या बाबतीत (तुझ्याकडून) काही आगळीक घडू नये.

कालिय – भगवन्, माझ्या विषामुळे हे (सर्व) पाणी दूषित झाले आहे. तर आताच विष काढून घेऊन, यमुनेच्या डोहातून मी दूर निघून जातो.

दामोदर – पुन्हा भेटीला या.

कालिय – जी, भगवान नारायणांची आज्ञा.

(परिवारासह निघून जातो.)

दामोदर – तर आता मी पण डोहातून वेचलेली फुले गोपबालिकांना देतो.

सर्वजणी – हे बघा धनी आमचं हृदय आनंदवीत, अंगावर एक ओरखडा न लागता, इकडेच येताहेत. स्वामींचा जय हो !

संकर्षण – अभिनंदन! गाई–ब्राह्मणांचे कल्याण झाले.

दामोदर – (ही) फुले घ्या.

सर्वजणी – धनी, मुनिजनांच्या हाती पण कधी न लागलेली ही फुलं हाती घेतलीत ...... चंद्राच्या आणि सूर्याच्या किरणांचा स्पर्श न झालेली.......... जशीच्या तशी ताजी...... धनी, आम्हांला भीती वाटते.

दामोदर – तुम्ही बिचाऱ्यांनी भय (म्हणजे काय ते) अगोदर पाहिलेच आहे, घाबरण्याचा अनुभव(ही)घेतला आहे. (आता) घाबरू नका, मुळीच घाबरू नका. माझ्या हाताच्या स्पर्शामुळे (ही फुले) सौम्य झाली आहेत........ घ्या !

सर्वजणी – जशी स्वामींची आज्ञा.

(एक)सैनिक – (प्रवेशून) गवळीदादा, नंदगोपांचा मुलगा कुठे गेला आहे!

गोपालक – हे काय धनी ...... कालिय नावाच्या महानागाला वठणीवर आणून गोपबालिकांच्या घोळक्यात उभे आहेत.

सैनिक – (जवळ जाऊन) अहो, नंदगोपपुत्र, अर्थाप्रमाणेच नाव असलेल्या महाराज उग्रसेनांचे पुत्र राजे कंस आपल्याला फर्मावताहेत की –

दामोदर – काय? फर्मावताहेत म्हणालास?

सैनिक – की ' मधुरा नगरीत धनुर्मह नावाचा मोठा उत्सव व्हायचा आहे. त्यात भाग घेण्यासाठी परिजनांसहित ' तुम्ही दोघांनी यावे.'

दामोदर – दादा, देवांचे गुप्त प्रयोजन साधण्याचा हा काळ आहे असे वाटते.

संकर्षण – तर आपण त्वरेने जाऊ या.

दामोदर – ठीक. उत्तम बेत! अहो, आता —

रत्नजडित मुकुट ढळला आहे,
केस विसकटले आहेत,
मोतीहार तुटला आहे, बाहूभूषण गळून पडले आहे,
जानवे लोंबत आहे,
अशा (स्थितीतल्या) कंसाला जोराने खेचून
अगोदर उद्धटपणा केलेल्या हत्तीला सिंहाने (मारावे) तसा
आज ठार करून टाकतो!
॥१३॥

(सर्व जातात).

## चौथा अंक पूर्ण झाला.

# अंक ५ वा

[ आता राजा कंस प्रवेश करतो ]

राजा कंस – अमाप पराक्रम आणि शक्तिसार असलेला
दामोदर गौळवाड्यात बलरामासह
(अनेक) कृत्ये करीत असल्याचे ऐकल्यावर
धनुर्मह (योजण्याची) आज्ञा देऊन,
(त्या निमित्ताने) त्याला इथे आणवून
तो रिंगणात उतरला म्हणजे
मल्लाकडून त्याचा आज मी घात करवितो. ॥१॥
ध्रुवसेन, ध्रुवसेन –

सैनिक ध्रुवसेन – (प्रवेश करून) महाराजांचा जय हो !

कंस – ध्रुवसेन, नंदगोपाचा पोरगा येऊन पोचला का ?

ध्रुवसेन – ऐकावे महाराजांनी – गोपजनांनी वेढलेल्या दामोदराने संकर्षणासह (नगरीत) प्रवेश करताच, (आमच्या) परिटांकडून (धुवट) वस्त्रे हिसकावून घेतली असे ऐकताच, (आपल्या) महामात्राने उत्पलापीड नामक गंधहस्तीलात्या च्यावर हल्ला करण्यासाठी (अंकुश टोचून) चालना दिली. तेव्हा –
एकाएकी चाल करून आलेल्या त्या (हत्ती) ला पाहून
भयभीत झालेल्या गोपाळवृंदामध्ये असलेल्या
(त्या) बाल (दामोदराने)
पर्वतप्राय गजेंद्राचा दात
ताकदीने उपटून
क्षणार्धात त्याला ठार केले ! ॥२॥

कंस – ठार केले, म्हणालास ? जा, आणखी काय झाले ते पाहून ये.

ध्रुवसेन – जशी महाराजांची आज्ञा (बाहेर जाऊन, पुन्हा आत येत) महाराजांचा जय हो ! आता, उत्सवाच्या प्रसंगासाठी उभारलेल्या ध्वजा-पताकांच्या वर लावलेल्या फुलांच्या लांबलचक माळांनी शृंगारलेल्या, अगुरूच्या वरवर चढणाऱ्या सुगंधित धूपाने भरलेल्या विशाल राजपथावर या नंदगोपपुत्राने प्रवेश केला. राजवाड्याच्या दाराजवळ सुगंधाची पेटिका हाती घेऊन (उभी) असलेल्या मदनिका नावाच्या कुब्जेला पाहिले ··· तिच्या हातातून सुगंधी द्रव्ये घेऊन ती आपल्या अंगाला लावली. तोच हात (तिच्या) कुबडावर चोळून तिचे कुबड नाहीसे केले······ पुष्पविक्रेत्यांच्या दुकानांतून बळजबरीने (विविध) फुले घेऊन ती (अंगावर) माळली... आणि (आता) धनु:शालेकडे तो वळला आहे.

कंस – त्याने आरंभले आहे तरी काय ? तेव्हा तावडतोब जा. काय होते आहे ते पाहून ये.

ध्रुवसेन – जशी महाराजांची आज्ञा. (बाहेर जाऊन पुन्हा आत येत) महाराजांचा जय हो ! धनु:शालेचा रक्षक सिंहबलाने त्याला अडविले तर कानाच्या खाली फटका मारून त्याने त्याला ठार केले ... धनुष्य उचलून त्याने त्याचे दोन तुकडे केले ... आणि आता तो सभामंडपाकडे गेला आहे. तो तर –

पावसाळी मेघपुंजासारखा (कृष्ण-नील) वर्णाचा,
पिवळे रेशमी वस्त्र नेसलेला,
फुलांची माळ आणि मोरपिसे (मस्तकी बांधून)
रंगीबेरंगी वेष परिधान केलेला,
(आपले) मोठे डोळे रागाने गरगर फिरवीत
बलरामासह इकडेच येतो आहे ······
जसा काही मृत्यूचाच अवतार झाला आहे ! ॥३॥

कंस – माझे हृदय जणू धडधडते आहे ! जा, सांगितल्याप्रमाणे चाणूर आणि मुष्टिकाला घेऊन ये. वृष्णिकुमारांना लढायला सज्ज राहण्याची आज्ञा दे.

ध्रुवसेन – जशी महाराजांची आज्ञा. [जातो.]

कंस – तर मी पण प्रासादाच्या (गच्ची) वर चढून चाणूर–मुष्टिकांचे

(मल्ल) युद्ध पाहातो. (जिना चढून वर जात) मधुरिके, (गच्चीचे) दार उघड.

प्रतिहारी – जशी स्वामींची आज्ञा.

[गच्चीवर प्रवेश करून कंस आसनावर बसतो. मग चाणूर आणि मुष्टिक सभामंडपातील रिंगणात येतात.]

चाणूर –

पुरेपूर माजावर आलेल्या मस्त हस्तीसारखा
मी हा लढायला सज्ज आहे.
(त्या) बाळ दामोदराला
रिंगणामध्ये मी आज मोडून काढतो. ।।४।।

मुष्टिक –

माझ्या हाताची मूठ म्हणजे लोखंडाचीच...
नावच आहे (माझे) मुष्टिक...
आणि मी संतापलो आहे!
वज्राने प्रचंड पर्वताचे शिखर पाडावे तसा
रामाला आज मी पाडून टाकणार आहे ।।५।।

ध्रुवसेन – हे महाराज (इथे आहेत). तुम्ही दोघांनी त्यांच्याजवळ जावे.

दोघे – (चाणूर-मुष्टिक) : (जवळ जाऊन) स्वामींचा जय हो!

कंस – चाणूर आणि मुष्टिक. तुम्ही दोघांनी प्रयत्नांची शर्थ करून आपले ऋण फेडले पाहिजे.

दोघे – ऐकावे धनी! खांद्यावर अर्धचंद्राकार बोटांची पकड, घणाघाती टोले, असे लढण्याचे खास डावपेच योजून आम्ही यश मिळवू. हां......
पाहाच धनी!

कंस – ठीक आहे, असेच करा. ध्रुवसेन, (त्या) गवळ्याच्या दोन पोरांना आत येऊ दे.

ध्रुवसेन – जशी महाराजांची आज्ञा. [जातो.]

[मग ध्रुवसेनाबरोबर दामोदर आणि संकर्षण प्रवेश करतात.]

दामोदर – दादा,

पूर्वजन्मात असुर असलेल्या क्षुद्र कंसाला
युद्धामध्ये खाली पाडून जोवर मी ओढीत नेत नाही
तोवर मर्त्य जनांत माझा (हा) जन्म फुकट आहे,
आणि गौळवाड्यात मी केलेली ती कृत्ये
या नगरात धीर देण्यासारखी नाहीत
(असेच म्हटले पाहिजे.) ॥६॥

संकर्षण – रिंगणात प्रवेश करून,
लोखंडी मूठ वळविलेल्या, चेकाळलेल्या
त्या मुष्टिकावर
(माझ्या) मुष्टीचे प्रहार करून,
अंतराळात जलमेघाला हेलकावे देणाऱ्या
प्रचंड वाऱ्याच्या झोतासारखा
मी वावरणार आहे ! ॥७॥

ध्रुवसेन – हे महाराज (कंस). आपण दोघांनी जवळ जावे.

दामोदर-संकर्षण – दोघे: काय ? कोणाचे महाराज ?

ध्रुवसेन – सर्व जगताचे, आणि आमचे पण.

दामोदर – आजपासून संपले !

ध्रुवसेन – महाराजांचा जयहो ! हे ते दोघे.

कंस – (निहाळून) हा तो दामोदर! अहो,
श्यामवर्णी,
बळकट खांदे आणि बाहू,
रुंद, भरलेली छाती,
मदमत्त हत्तीसारखी धीमी ऐटदार चाल;
(असा हा) सौंदर्याने, ऐश्वर्याने शोभतो आहे.
त्याची पूर्वी ऐकलेली कृत्ये
(म्हणजे) काही आश्चर्य नव्हे..........

तिन्ही लोकांची उलटापालट करायला
हा समर्थ आहे! ॥८॥

(आणि) हा सुंदर, गंभीर आकृतीचा त्याचा मोठा भाऊ राम असे ऐकतो.

चंद्रासारखी याची मूर्ती,
ताज्या कमळासारखे स्वच्छ, मोठे डोळे,
नेसूचे किंमती निळे वस्त्र,
चांदीच्या अडसरासारखे गोल, लांब बाहू;
नील कमलांच्या पाकळ्यांची रंगीत पुष्पमाळा
(त्याच्या गळ्यात) झुलते आहे. ॥९॥

दामोदर – दादा, हे दोघे आपल्याशी युद्ध करायला कसले आहेत असे मला वाटते.

संकर्षण – असावेत.

कंस – ध्रुवसेन, युद्धाला सुरुवात होऊ द्या.

ध्रुवसेन – जशी महाराजांची आज्ञा.

[फुलांची माळ फेकतो.]

चाणूर-मुष्टिक – अरे हो, वाजवा, शंख-दुंदुभि वाजवा!

चाणूर – ये दामोदरा, माझ्या दोन हातांशी (लढून) आज यश मिळून दाखव.

दामोदर – हा मी आलो.......... उभा रहा..........
माझा हा वेग (वार् हल्ला) सहन कर. हल्ल्याला तोंड दे.

मुष्टिक – ए ए रामा! माझ्या मुठीने तुझ्या गात्रांचे पीठ झाले म्हणजे (त्यातून) गळणाऱ्या रक्ताच्या लोटात बुडून जाऊन तू आज प्राण पाखडशील.

संकर्षण – मुष्टिका, तुला आज
यमाच्या भेटीला पाठवितो.
[सर्वजण-चौघे–बाहुयुद्ध करतात.]

दामोदर – याची हाडे मोडून मी याला मारले आहे .......

संकर्षण - मी पण याला ठार केले आहे !

दामोदर - आणि (आता) कंसासुराला
मी यमलोकाला घेऊन जातो ! ॥१०॥
[प्रासादाच्या गच्चीवर चढून कंसाचे (डोके) केस धरून त्याला खाली फेकीत]
ह्या ह्या दुरात्मा कंसाचे–
खांदे, कंठ, कमर, गुडघे, मांड्या आणि पाय
मोडून गेले आहेत......
डोळे बाहेर येऊन गरगरा फिरताहेत....
सर्व मुखावर रक्त पसरले आहे........
हार तुटला आहे......बाहुभूषण गळून पडले आहे......
यज्ञोपवीत लोंबते आहे......
वज्राने शिखर चक्काचूर होऊन
(एखादा) पर्वत कोसळावा
तसा हा पडला आहे ! ॥११॥

(पडद्याआड) ' हाय, हाय, महाराज ! '
(पुन्हा पडद्याआड) 'अहो अहो वृष्णिसैनिकांनो, अनावृष्टि, शिवक, हृदिक, पृथुक, सोमदत्त, अक्रूर (वगैरे) प्रमुख वीरांनो, धन्याच्या खाल्लेल्या अन्नाची परतफेड करण्याची ही वेळ आली आहे ! दौडत या हो सर्वजण !

दामोदर - दादा, (या) सैन्याला आवरून धरा.

संकर्षण - हा काय...... (क्षणार्धात) आवर घालतो.
वेगाने दौडणाऱ्या घोडे, रथ, हत्ती यांच्याबरोबर
इतस्ततः धावणारे सैनिक उच्चरवाने गर्जत आहेत...
स्वच्छ केलेली खड्ग, प्रास, शक्ति, ऋष्टि, भाले
(इत्यादी शस्त्रे) चमकत आहेत ...
अशा (या) सैन्याला –
वाऱ्याच्या सोसाट्याने डहुळलेल्या,
फेसाचे पुंजके आणि लाटांच्या माळा
(पृष्ठभागावर गोळा झालेल्या) समुद्राप्रमाणे,
हा मी दोन्ही हातांनी ढवळून टाकतो. ॥१२॥

[मग वसुदेव प्रवेश करतो.]

वसुदेव - अहो, मथुरेच्या नागरिकांनो, नका, (भलते) साहस करू नका !
हा माझा मोठा मुलगा...रोहिणीचा पुत्र
आणि देवकीच्या या मुलाला तुम्ही ओळखत नाही का?
(तेव्हा) चिलखते काढून टाका...
शस्त्रांचे (इथे) काय काम आहे?
कंसाच्या (वधा) साठी स्वतः विष्णू
(अवतार घेऊन) आले आहेत! ॥१३॥

संकर्षण - (पाहून) अरे, तात (की हे)! तात, मी संकर्षण... वंदन करतो !

दामोदर - तात, मी दामोदर .. वंदन करतो.

वसुदेव - अक्षय विजयाचे वाटेकरी व्हा तुम्ही दोघे ! सत्पुत्रांना जन्म देण्याचे फळ आज मला मिळाले आहे!

दोघे - आमच्यावर अनुग्रह झाला.

वसुदेव - कोणी आहे का जवळ ?

सैनिक (ध्रुवसेन) - (प्रवेश करून) आर्यपुत्रांचा जय हो !

वसुदेव - ही मृत शरीरे दूर करा.

ध्रुवसेन - जशी आर्यपुत्रांची आज्ञा.

सर्व गोपालक - अहाहा! (आता) गोपाळांचे राज्य झाले !

वसुदेव - कोणी आहे का ?

ध्रुवसन - आर्यपुत्रांचा जय हो !

वसुदेव - जा, दामोदराच्या आदेशाप्रमाणे अनाधृष्टीला ताबडतोब आज्ञा दे की, महाराज उग्रसेनांच्या शृंखला काढून टाकून, त्यांना अभिषेक करवून इकडे घेऊन ये.

ध्रुवसेन - जशी आर्यपुत्रांची आज्ञा. [जातो.]

वसुदेव - अरे,
देवांच्या दुंदुभि वाजताहेत

पुष्पवृष्टी (खाली) पडते आहे .. ...
वाटते की, कंसवध करणाराची पूजा करण्यास्तव
देव आले आहेत. ।।१४।।

[ पडद्या आड

'त्रैलोक्याचा जेता, देवांच्या राजाचाही स्वामी,
कमलाप्रमाणे विशाल, सुंदर नेत्र असलेला
(हा) ऐश्वर्यसंपन्न देवश्रेष्ठ –
सोन्याने मढविलेल्या प्रासादांची रांग असलेल्या,
विशाल राजभवन, दुकाने, गोपुरे, उंच शिखरे
असलेल्या या मथुरा (नगरी) चे
सदैव रक्षण करो !' ] ।।१५।।

**वसुदेव –** अहो, अहो, मथुरानिवासी जनहो, ऐका ऐका, तुम्ही सारे. दैत्यराजाच्या नगरीची अर्गला उखडून टाकण्याची कुशलता असलेल्या, सर्व क्षत्रियांची फिरलेली पाठ (तुच्छतेने) पहाणाऱ्या, वसुदेवापासून जन्म घेतलेल्या या वसुदेवाच्या कृपाप्रसादामुळे, पुन्हा राज्याधिकार प्राप्त झालेल्या उग्रसेन महाराजांच्या ( राज ) शासनाची घोषणा आता करण्यात येत आहे !

**सर्व –** आता वृष्णिराज्याला स्थैर्य आणि प्रतिष्ठा लाभली.

**वसुदेव –** महाराजांना घेऊन या.

**ध्रुवसेन –** जशी आर्यपुत्रांची आज्ञा. [ जातो ]

[ मग उग्रसेन प्रवेश करतो. ]

**उग्रसेन –** विष्णूने इंद्राचा जसा,
तसा केशिसूदन कृष्णाने,
दीर्घकालाच्या बंदिवासाने आलेला
माझा क्लेश स्वसामर्थ्याने दूर केला आहे. ।।१६।।
भगवंताच्या कृपेमुळे संकटांच्या समुद्रातून मी वर आलो आहे.

(मग नारद प्रवेश करतात.)

**नारद –** कंसाचा चेंदामेंदा झाल्यावर
देवांच्या आज्ञेने विष्णूची पूजा करण्यासाठी
गंधर्व आणि अप्सरा यांच्या समवेत
देवलोकाहून मी इथे आलो आहे. ।।१७।।

दामोदर – अरे, देवर्षी नारद ! देवर्षि, स्वागत असो. हा अर्घ्य, हे पादोदक.

नारद – सगळ्याचा स्वीकार करतो. ( आता ) गंधर्व आणि अप्सरा ( स्तुतिगीत ) गातील.

नारायणा तुला नमस्कार असो !
सर्व देवता वंदन करीत आहेत.
असुराच्या या नाशामुळे
पृथिवीचे सर्वथा रक्षण झाले आहे. ॥१८॥

दामोदर – देवर्षे, मला पूर्ण संतोष आहे. मी आपले आणखी काय बरे प्रिय करू?

नारद – विष्णू जर माझ्यावर पूर्ण संतुष्ट असतील
तर माझ्या परिश्रमाचे सार्थक झाले.
सर्व देवश्रेष्ठांना घेऊन
मी देवलोकी जाईन म्हणतो. ॥१९॥

दामोदर – यावे, आपली भेट पुन्हा व्हावी.

नारद – जशी भगवान नारायणांची आज्ञा. [जातो]

(भरतवाक्य)

सागरापर्यंत पसरलेल्या,
हिमालय आणि विंध्य (पर्वतांची) कुंडले
धारण करणाऱ्या,
एकच्छत्र अंमलाखालील या पृथ्वीवर
आमच्या सिंहपराक्रमी राजाचे
उत्तम शासन राहो ! ॥२०॥

## पाचवा अंक पूर्ण झाला.

## ॥ बालचरित नाटक समाप्त ॥

# बालचरितम् ।

## प्रथमोऽङ्कः

( नान्द्यन्ते ततः प्रविशति सूत्रधारः । )

सूत्रधार :—

शङ्खक्षीरवपुः पुरा कृतयुगे नाम्ना तु नारायण-
स्त्रेतायां त्रिपदार्पितत्रिभुवनो विष्णुः सुवर्णप्रभः ।
दूर्वाश्यामनिभः स रावणवधे रामो युगे द्वापरे
नित्यं योऽञ्जनसन्निभः कलियुगे वः पातु दामोदरः ॥ १ ॥

एवमार्यमिश्रान् विज्ञापयामि । अये, किन्नु खलु मयि विज्ञापनव्यग्रे शब्द इव श्रूयते । अङ्ग ! पश्यामि ।

( नेपथ्ये )

अहं गगनसञ्चारी ।

सूत्रधार :— भवतु, विज्ञातम् ।

पतत्यसौ पुष्पमयी च वृष्टिर्नदन्ति तूर्याणि च देवतानाम् ।
द्रष्टुं हरिं वृष्णिकुले प्रसूतमभ्यागतो नारद एष तूर्णम् ॥ २ ॥

( निष्क्रान्तः । )

स्थापना

( ततः प्रविशति नारदः । )

नारद :—

अहं गगनसञ्चारी त्रिषु लोकेषु विश्रुतः ।
ब्रह्मलोकादिह प्राप्तो नारदः कलहप्रियः ॥ ३ ॥

भोः !

क्षीणेषु देवासुरविग्रहेषु नित्यप्रशान्ते न रमेऽन्तरिक्षे ।
अहं हि वेदाध्ययनान्तरेषु तन्त्रीश्च वैराणि च घट्टयामि ॥ ४ ॥

अपि च,

भक्तिः परा मम पितामहभाषितेषु
सर्वाणि मे बहुमतानि तपोवनानि ।
सत्यं ब्रवीमि करजाग्रहता च वीणा
वैराणि भीमकठिनाः कलहाः प्रिया मे ॥ ५ ॥

तद् भगवन्तं लोकादिमनिधनमव्ययं लोकहितार्थे कंसवधार्थे वृष्णिकुले प्रसूतं नारायणं द्रष्टुमिहागतोऽस्मि । अये, इयमत्रभवती देवकी मायया शिशुत्व-मुपागतं त्रिलोकेश्वरं प्रगृह्य वसुदेवेन सह शनैः स्वगृहान्निष्क्रामति । यैषा,

लोकानामभयकरं गुरुं सुराणां
दैत्यानां निधनकरं रथाङ्गपाणिम् ।
शोकार्ता शशिवदना निशि प्रशान्ता
बाहुभ्यां गिरिमिव मन्दरं वहन्ती ॥ ६ ॥

एष भगवान् नारायणः,

अनन्तवीर्यः कमलायताक्षः सुरेन्द्रनाथोऽसुरवीर्यहन्ता ।
त्रिलोककेतुर्जगतश्च कर्ता भर्ता जनानां पुरुषः पुराणः ॥ ७ ॥

हन्तैतदुत्पन्नं कलहस्य मूलम् । यावदहमपि भगवन्तं नारायणं प्रदक्षिणीकृत्य ब्रह्मलोकमेव यास्यामि । नमो भगवते त्रैलोक्यकारणाय ।

नारायणाय नरलोकपरायणाय
लोकाननाय कमलामललोचनाय ।
रामाय रावणविरोचनपातनाय
वीराय वीर्यनिलयाय नमो वराय ॥ ८ ॥

( निष्क्रान्तः । )

( ततः प्रविशति बालहस्ता देवकी । )

देवकी— हा धिक्, पुत्रकस्य मे महानुभावत्वं सूचयिष्यन्ति जन्मसमयसमुद्भूतानि महानिमित्तानि प्रत्यक्षीकुर्वत्यपि कंसहतकनृशंसत्वं चिन्तयन्ती सुष्ठु न प्रत्येमि मन्दभागिनी । क्व नु गत आर्यपुत्रः । अम्मो, एष आर्यपुत्रो हर्षविस्मयफुल्लनयन इत एवागच्छति ।

( ततः प्रविशति वसुदेवः । )

वसुदेवः--- ( सविमर्शम ) भोः ! किं नु खल्विदम्,

भ्रमति नभसि विद्युच्चण्डवातानुविद्धै-

र्नवजलदनिनादैर्मेदिनी सप्रकम्पा ।

इह तु जगति नूनं रक्षणार्थं प्रजाना-

मसुरसमितिहन्ता विष्णुरद्यावतीर्णः ॥९॥

( विलोक्य ) एषा देवकी,

अगणितपरिखेदा याति षण्णां सुताना-

मपचयगमनार्थं सप्तमं रक्षमाणा ।

बहुगुणकृतलोभा जन्मकाले निमित्तैः

सुत इति कृतसंज्ञं कंसमृत्युं वहन्ती ॥१०॥

देवकी--- ( उपसृत्य ) जयत्वार्यपुत्रः ।

वसुदेवः --- देवकि ! अर्धरात्रः खलु वर्तते । प्रसुप्तो मथुरायां सर्वो जनः । तस्माद् यावन्न कश्चित् पश्यति, तावद् बालं गृहीत्वाऽपक्रामामि ।

देवकी-- क्वार्यपुत्र इमं नेष्यति ।

वसुदेवः-- देवकि ! सत्यं ब्रवीमि । अहमपि न जाने । किन्तु, एकच्छत्र -च्छायां पृथिवीं समाज्ञापयति दुरात्मा कंसः । तत् क्व नु खल्वयमायुष्मान् नेतव्यो भविष्यति । अथवा यत्र दैवं विधास्यति, तत्र बालं गृहीत्वाऽपक्रामामि ।

देवकी:-- आर्यपुत्र ! इच्छामि तावदेनं सुदृष्टं कर्तुम् ।

वसुदेवः--- अयि अतिपुत्रवत्सले !

किं द्रष्टव्यः शशाङ्कोऽयं राहोर्वदनमण्डले ।

त्वयाऽप्यस्य सुदृष्टस्य कंसो मृत्युर्भविष्यति ॥११॥

देवकी- सर्वथा न भविष्यति ।

वसुदेव :-- यद् भवत्याऽभिहितं, तत् सर्वदैवतैरभिहितं भवतु । आनय ।

देवकी- गृह्णात्वार्यपुत्रः ।

वसुदेवः- (गृहीत्वा) अहो गुरुत्वं बालस्य । साधु,

विन्ध्यमन्दरसारोऽयं बालः पद्मदलेक्षणः ।

गर्भे यया धृतः श्रीमानहो धैर्यं हि योषितः ॥१२॥

देवकि ! प्रविश त्वमभ्यन्तरम् ।

देवकी--- एषा गच्छामि मन्दभागा । ( निष्क्रान्ता । )

वसुदेवः - एषा देवकी,

हृदयेनेह तत्राङ्गैर्द्विधाभूतेव गच्छति ।
यथा नभसि तोये च चन्द्रलेखा द्विधाकृता ॥१३॥

हन्त प्रविष्टा देवकी । यावदहमपि नगरद्वारं संश्रयामि । एष भोः,
प्रथमसुतविनाशजातमन्युर्नृपतिभयाकुलितः प्रगृह्य बालम् ।
त्वरिततरमिह प्रयामि मार्गे गिरिमिव मन्दरमुद्वहन्भुजाभ्याम् ॥१४॥

( परिक्रम्य ) इदं नगरद्वारम् । यावत् प्रविशामि । (प्रविश्य) अये प्रसुप्तो मधुरायां सर्वो जनः । यावदपक्रामामि । ( परिक्रम्य ) निष्क्रान्तोऽस्मि मधुरायाः । अहो बलवांश्चायमन्धकारः । सम्प्रति हि,

लिम्पतीव तमोऽङ्गानि वर्षतीवाञ्जनं नभः ।
असत्पुरुषसेवेव दृष्टिर्निष्फलतां गता ॥१५॥

अहो तमसः प्रभुत्वम् ।

अप्रकाशा इव दिशो घनीभूता इव द्रुमाः ।
सुनिविष्टस्य लोकस्य कृतो रूपविपर्ययः ॥१६॥

नाहं गन्तुं समर्थः । अये दीपिकालोकः । किन्नु खलु दुरात्मा कंसो ममापक्रमणं ज्ञात्वा दीपिकाभिः परिवृतो मां ग्रहीतुमागतो भवेत् । भवत्वहमस्य दर्पप्रशमनं करोमि । ( खड्गमुत्कोशयति । निवृत्यावलोक्य ) अये न कश्चिद् दृश्यते । आः,

तमसा संवृते लोके मम मार्गमपश्यतः ।
अपक्रमणहेतोस्तु कुमारेण प्रभा कृता ॥१७॥

एष मार्गः । यावदपक्रामामि । अये इयं भगवती यमुना कालवर्षसम्पूर्णा स्थिता । अहो व्यर्थो मे परिश्रमः । किमिदानीं करिष्ये । भवतु, दृष्टम् ।

इमां नदीं ग्राहभुजङ्गसङ्कुलां
महोर्मिमालां मनसापि दुस्तराम् ।
भुजप्लवेनाशु गतार्थविक्लवो
वहामि सिद्धिं यदि दैवतं स्थितम् ॥१८॥

( तथा कृत्वा सविस्मयम्) हन्त द्विधा छिन्नं जलम्, इतः स्थितम्, इतः प्रधावति । दत्तो मे भगवत्या मार्गः । यावदपक्रामामि । ( अवतीर्य ) निष्क्रान्तोऽस्मि यमुनायाः । अये हुङ्कारशब्द इव श्रूयते । व्यक्तं घोषसमीपे वर्तते मन्दभाग्यः । आः, अत्र च समीपघोषे मम वयस्यो नन्दगोपः प्रतिवसति । स खलु मया कंसाज्ञया निगडितो कशाभिहतश्च । यावत् प्रविशामि । अथवा रात्रौ वसुदेवः प्रविष्ट इति शङ्किता गोपालका

भविष्यन्ति । तस्मादिह न्यग्रोधपादपस्याधस्तात् प्रभातवेलां रजन्याः प्रतिपालयामि । भो भो न्यग्रोधदेवताः ! यद्ययं बालो लोकहितार्थं कंसवधार्थं वृष्णिकुले प्रसूतश्चेद्, घोषात् कश्चिदिहागच्छतु । न, न, मम वयस्यो नन्दगोप एवागच्छतु ।

( ततः प्रविशति दारिकां गृहीत्वा नन्दगोपः ।)

नन्दगोप :– (सशोकम्)

दारिके ! दारिके ! किमिदानीं नो गेहलक्ष्म्यां न रत्त्वा ततो न उज्झित्वा ननु गच्छसि । संप्रति हि महिषशतसंपातसदृशोऽह्रो बलवानन्धकारः ।

दुर्दिनविनष्टज्योत्स्ना रात्रिर्वर्तते निमीलिताकारा ।
संप्रावृतप्रसुप्ता नीलनिवसना यथा गोषी ॥१९॥

अद्य ह्यर्धरात्रेऽस्माकं कुटुम्बिन्या यशोदया प्रसूतेयं च दारी तपस्विनी जातमात्रैवापगतप्राणा संवृत्ता । श्वोऽस्माकं घोषस्योचित इन्द्रयज्ञो नामोत्सवो भविष्यति । तद् मा खल्वेतद् दुःखं गोपजनैरनुभूयमानमिति मयैकाकिना निगलगुरु–चरणेनेमां दारिकां गृहीत्वा निर्गतोऽस्मि । यशोदापि तपस्विनी नैव जानाति दारको वा दारिका वा प्रसूत इति मोहं गता । दारिके ! दारिके !

वसुदेवः--- को नु खल्वयं रात्रौ परिदेवयति । अस्मत्सब्रह्मचारी खल्वयं तपस्वी ।

नन्दगोपः- किमिदानीं नो गेहलक्ष्म्यां न रत्त्वा ततो न उज्झित्वा ननु गच्छसि ।

वसुदेवः-- स्वरेण प्रत्यभिजानामि । मम वयस्येन नन्दगोपेन भवितव्यम् । यावच्छब्दापयामि । वयस्य ! नन्दगोप ! इतस्तावत् ।

नन्दगोपः--(सभयम्)अविहा क इदानीं मां श्रुतपूर्वेणेव स्वरयोगेन नन्दगोप ! इति मां शब्दयति । किं नु राक्षसो वा, उत पिशाचो वा। ईदृश्यां प्रतिभयरजन्यां मृता दारिका मम हस्ते । किं नु खलु करिष्यामि ।

वसुदेवः- वयस्य नन्दगोप ! अलमन्यशङ्कया । इतस्तावत् ।

नन्दगोपः- ( कर्णं दत्वा । सावधानम् ) अम्मो,
स्वरयोगेन भर्ता वसुदेव इति जानामि । यावदुपसर्प्यामि ।

अथवा तत्र मम किं कार्यम्। एतेन कंसस्य राज्ञो वचनं श्रुत्वाऽपराद्धः कशाभिस्ताडयित्वा निर्गलैर्बद्धोऽस्मि । तत्र गमिष्यामि । अथवा धिक् खलु मे नृशंसभावम् । मम गुणसहस्त्रं कृतं, दुःखे दुःखयति, सुखे सुखी भवति, तथापि स्मरामि राजशासनेन कृतमेकबन्धनम् । यावदुपसर्प्स्यामि । इयं दारी । किं करिष्यामि। भवत्वेवं तावत् करिष्यामि। ( उपसृत्यावलोक्य च। सविस्मयम् ) प्रभाता रजनी। एष भर्ता वसुदेवो दारकं गृहीत्वा स्थितः। (उपसृत्य) जयतु भर्ता जयतु।

वसुदेवः- वयस्य नन्दगोप ! अपि भगवतीभ्यो गोभ्यः कुशलम्।

नन्दगोपः- आम् भर्तः ! कुशलम् ।

वसुदेवः- अथ भवतः परिजनस्य कुशलम्।

नन्दगोपः- परिजनमिति। आम् भर्तः ! कुशलम् ।

वसुदेवः- वयस्य ! किमिदानीं प्रच्छाद्यते।

नन्दगोपः- भर्तः ! नास्ति किंचित्।

वसुदेवः- मम खलु प्राणैः शापितः स्याद् यदि सत्यं न ब्रूयात्।

नन्दगोपः- का गतिः। शृणोतु भर्ता। अद्यार्धरात्रेऽस्माकं कुटुम्बिन्या, न हि न हि, युष्माकं दास्या यशोदया प्रसूतेय च दारी तपस्विनी जातमात्रैवापगतप्राणा संवृत्ता। श्वोऽस्माकं घोषस्योचित इन्द्रयज्ञो नामोत्सवो भविष्यति। तद् मा खल्वेतद् दुःखं गोपजनैरनुभूयमानमिति मयैवाकिना निगलगुरुचरणेनेमां दारिकां गृहीत्वा निर्गतोऽस्मि । यशोदापि तपस्विनी नैव जानाति दारको दारिका वा प्रसूत इति मोहं गता।

वसुदेवः- हन्त भोः ! न शक्यं लोकस्याधिष्ठानभूतं कृतान्तं वञ्चयितुम् । वयस्य ! काष्ठभूतं कलेवरं त्यज्यताम् ।

नन्दगोपः- न शक्नोमि भर्तः ! न शक्नोमि।

वसुदेवः- ईदृशो लोकधर्मः । त्यज्यताम्।

नन्दगोपः- यद् भर्ताज्ञापयति। दारिके ! दारिके ! ( इति रोदिति। )

वसुदेवः- वयस्य ! अलमलं रुदितेन। उत्तिष्ठोत्तिष्ठ ।

नन्दगोपः- ( तथा कृत्वोपगम्य ) जयतु भर्ता। अनेन दासजनेन किं कर्तव्यम् ।

वसुदेवः- वयस्य ! ननु त्वमपि जानासि दुरात्मना कंसेन मम षट् पुत्रा निधनमुपानीता इति ।

नन्दगोपः- जानामि भर्तः ! जानामि ।

वसुदेवः- तत् सप्तमोऽयं दीर्घायुः । नास्ति मम पुत्रेषु भाग्यम्। तव भाग्याज्जीवितं गृह्यताम् ।

नन्दगोपः- बिभेमि भर्तः ! बिभेमि । यदि कंसो राजा शृणोति वसुदेवस्य दारको नन्दगोपस्य हस्ते न्यासो निक्षिप्त इति, किं बहुना, गतमेव मे शीर्षम् ।

वसुदेवः- (आत्मगतम् ) हन्त विपन्नं कार्यम् । उक्तज्ञाः खलु नृशंसाः । तदेवं कथयामि । (प्रकाशम्) वयस्य नन्दगोप !

यद्यस्मि भवतः किञ्चिन्मया पूर्वकृतं भवेत् ।
तस्य प्रत्युपकारस्य कालस्ते समुपागतः ॥ २० ॥

नन्दगोपः- किं किं प्रत्युपकार इति। यदि कंसो वा भवतु, कंसस्य पितोग्रसेनो वा भवतु । आनयतु भर्ता दारकम् ।

वसुदेवः- वयस्य । गृह्यताम् ।

नन्दगोपः- भर्तः ! अशौचितोऽस्मि, मृता दारिका गृहीता। मुहूर्तकं प्रतिपालयतु भर्ता, यावद् यमुनाजलं गत्वा शौचं करोमि ।

वसुदेवः- वयस्य ! घोषवासात् प्रकृत्या शुचिरेव भवान् ।

नन्दगोपः- तेन ह्यस्माकं घोषस्योचितं पांसुना शौचं करोमि ।

वसुदेवः- कोऽत्र ! दोषः । क्रियतां शौचम् ।

नन्दगोपः- यद् भर्ताज्ञापयति। (तथा कुर्वन् सविस्मयम् ) आश्चर्यमाश्चर्यं भर्तः ! आश्चर्यम् । पांसून् मार्गयतो धरणीं भित्वा युगप्रमाणा सलिलधारोत्थिता ।

वसुदेवः- बालस्यैव प्रभावः । क्रियतां शौचम् ।

नन्दगोपः- भर्तः ! तथा। (तथा कृत्वोपसृत्य) भर्तः ! अयमस्मि

वसुदेव :- गृह्यताम्।

नन्दगोपः- भर्तः ! अतिदुर्बलौ मे बाहू मन्दरसदृशं बालकं ग्रहीतुं न समर्थौ।

वसुदेवः- वयस्य ! महाबलपराक्रमः खलु भवान्।

नन्दगोपः- शृणोतु भर्ता मम बलपराक्रमम्। सन्दारयमाणे वृषभे शृङ्गं गृहीत्वा मोचयामि। पङ्कनिमग्नान् भाण्डशकटकान् आघट्टयामि। ईदृश इदानीमहं दारकं ग्रहीतुं न समर्थोऽस्मिही।

( ततः प्रविशन्ति पञ्चायुधानि गरुडश्च )

गरुडः--

अहं सुपर्णो गरुडो महाजवः शाङ्गार्युधस्यास्य रथो ध्वजश्च।
पुरा हि देवासुरविग्रहेषु वहामि भो विष्णुबलेन विष्णुम् ॥ २१ ॥

चक्र :--

कृष्णस्य चक्रोऽस्मि कराग्रशोभी मध्याह्नसूर्यप्रतिमोग्रतेजाः।
त्रिविक्रमे चामृतमन्थने च मया हता दानवदैत्यसंघाः ॥ २२ ॥

शार्ङ्ग:--

शाङ्र्गोऽस्मि विष्णुकरलग्नसुवृत्तमध्या
स्त्रीविग्रहात् पुरुषवीर्यबलातिदर्पा।
यस्यार्थमाहवमुखेषु मयारिसङ्घाः
प्रभ्रष्टनागरथवाजिनराः प्रभग्नाः ॥ २३ ॥

कौमोदकी --

कौमोदकी नाम हरेर्गदाहमाज्ञावशात् सर्वरिपून् प्रमथ्य।
मया हतानां युधि दानवानां प्रक्रीडितं शोणितनिम्नगासु ॥ २४ ॥

शङ्खः--

अहं हि शङ्खः क्षीरोदाद् विष्णुना स्वयमुद्धृतः।
मम शब्देन नश्यन्ति युद्धे ते देवशत्रवः ॥ २५ ॥

नन्दकः-

नन्दकोऽहं न मे कश्चित् सङ्ग्रामेऽव्यपराङ्मुखः ।
गच्छामि स्मृतमात्रेण विष्णुना प्रभविष्णुना ॥ २६ ॥

चक्रः-

चक्रशार्ङ्गगदाशङ्खनन्दका दैत्यमर्दनाः ।
वासुदेवस्य कार्यार्थं प्राप्ताः पारिषदा वयम् ॥ २७ ॥

तस्मादागम्यताम् । वयमपि मनुष्यलोकमवतीर्णस्य भगवतो वष्णोर्बालचरितमनुचरितुं गोपालकवेषप्रच्छन्ना घोषमेवावतरिष्यामः ।

सर्वे- तथास्तु । ( विष्णुमुपस्थिताः )

वसुदेवः- वयस्य ! बाल एव नमस्यताम् ।

नन्दगोपः- भर्तः ! तथा । राजदारक ! नमस्ते नमस्ते । ही, भवतु, आत्मनैवात्मानं निर्वोढुय । अस्माकं गोपजनस्य त्वां ग्रहीतुं को बलपराक्रमः ।

चक्रः- नमो भगवते नारायणाय । भगवन् ! महाविष्णो !

कार्याण्यकार्याण्यमरासुराणां
त्वया भविष्यन्ति बहूनि लोके ।

तस्माज्जनस्यास्य लघुत्वयोगात्
कुरु प्रसादं यदुवंशकेतो ! ॥ २८ ॥

वसुदेवः- गृह्यताम् ।

नन्दगोपः- यद् भर्ताज्ञापयति । (गृह्णाति)

वसुदेवः- वयस्य ! प्रभाता रजनी । प्रतिनिवर्ततां भवान् ।

नन्दगोपः- आश्चर्यमाश्चर्यं भर्तः ! आश्चर्यम् । इमे बन्धने पतिते ।

वसुदेवः- सर्वमेतत् कुमारस्य प्रभावः । प्रतिनिवर्ततां भवान् ।

नन्दगोपः- यद् भर्ताज्ञापयति ।

वसुदेवः- अथवा एहि तावत् ।

नन्दगोपः- भर्तः ! अयमस्मि ।

वसुदेवः–

जाने नित्यं वत्सलं त्वां प्रकृत्या
स्नेहोऽप्यस्मिन्नर्थ्यते रूढभावः ।
अस्मिन् काले दग्धभूयिष्ठशेषं
न्यस्तं बीजं रक्षितुं यादवानाम् ॥ २९ ॥

कुमारस्य किं करिष्यति भवान् ।

नन्दगोपः– शृणोतु भर्ता । एकस्मिन् गेहे गत्वा क्षीरं पिबति । अन्यस्मिन् गेहे गत्वा दधि भक्षयति । अपरस्मिन् गेहे गत्वा नवनीतं गिलति । अन्यस्मिन् गेहे गत्वा पायसं भुङ्क्ते । इतरस्मिन् गेहे गत्वा तक्रघटं प्रलोकते । किं बहुना, अस्माकं घोषस्य पतिर्भवति ।

वसुदेवः– एवमस्तु । प्रतिनिवर्ततां भवान् ।

नन्दगोपः– यद् भर्ताज्ञापयति । (निष्क्रान्तः ।)

वसुदेवः– ननु निर्गतो नन्दगोपः । यावदहमपि मधुरामेव यास्यामि । (परिक्रम्य) रुदितशब्द इव श्रूयते । किं नु खलु कंसभयात् प्रतिनिवृत्तो नन्दगोपः । (परिक्रम्य) अये प्रत्यागतप्राणेयं दारिका । यावदिमां गृहीत्वा देवक्या हस्ते निक्षिप्य दुरात्मानं कंसं वञ्चयामि । (गृहीत्वा) अहो गुरुत्वमस्याः । एतदपि कुमारात् किञ्चिदन्तरं महद् भूतम् । यावदपक्रामामि । अये इयं भगवती यमुना तथैव स्थिता । यावदपक्रामामि । निष्क्रान्तोऽस्मि यमुनायाः । एतन्नगरद्वारम् । तथैव प्रसुप्तो मधुरायां सर्वो जनः । यावत् प्रविशामि । (प्रविश्य) इदं खलु दुरात्मनः कंसस्य गृहं ज्येष्ठाश्रितमिव दृश्यते । इदमस्मदीयं गृहं श्रियारूढमिव दृश्यते । यावदहमप्यन्तःपुरं प्रविश्य देवकीं समाश्वासयामि ईश्वराः स्वस्ति कुर्वन्तु । (निष्क्रान्तः ।)

## इति प्रथमोऽङ्कः ।

## अथ द्वितीयोऽङ्कः ।

( ततः प्रविशन्ति चांडालयुवतयः । )

सर्वाः– आगच्छ भर्तः ! आगच्छ । अस्माकं कन्यानां त्वया सह विवाहो भवतु ।

( ततः प्रविशति राजा । )

राजा– भोः ! किन्नु खल्विदम् ।

यन्मेदिनी प्रचलिता पतिताग्रहर्म्या
सन्तारनौरिव विकीर्णमहोर्मिमाला ।
सेव्यैः प्रधानगुणकर्मफलैर्निमित्तैः
किं वाग्रतो व्यसनमभ्युदयो नु तन्मे ॥ १ ॥

सर्वाः– आगच्छ । भर्तः ! आगच्छ । अस्माकं कन्यकानां त्वया सह विवाहो भवतु ।

राजा–

यस्मान्न रक्षिपुरुषाः प्रचरन्ति केचिद्
यस्मान्न दीपकधरा प्रमदाश्चरन्ति ।
तस्मादिमा मम गृहं समनुप्रविष्टा
नीलोत्पलाञ्जननिभा भयदाः श्वपाक्यः ॥ २ ॥

सर्वाः– आगच्छ भर्तः ! आगच्छ । अस्माकं कन्यकानां त्वया सह विवाहो भवतु।

राजा– अहो धृष्टाः खल्वेताश्चण्डालयुवतयः –

क्रोधेन नश्यति सदा मम शत्रुपक्षः
सूर्यः शशी हुतवहश्च वशे स्थिता मे ।
योऽहं यमस्य च यमो भयदो भयस्य
तं मापवादवचनैः परिधर्षयन्ति ॥ ३ ॥

सर्वाः– आगच्छ भर्तः ! आगच्छ ।

राजा- आ अपध्वंस। कथं सहसैव नष्टाः। यावदिदानीमभ्यन्तरमेव प्रविशामि।

( ततः प्रविशति शापः। )

शापः– हं, क्वेदानीं प्रविशसि। इदं खलु मम गृहं संवृत्तम्।

राजा–

कोऽयं विनिष्पतति गर्भगृहं विगाह्य
उल्कां प्रगृह्य सहसाञ्जनराशिवर्णः।
भीमोग्रदंष्ट्रवदनो ह्यहिपिङ्गलाक्षः
क्रोधो महेश्वरमुखादिव गां प्रपन्नः ॥४॥

को भवान्।

शापः– किं न जानीषे माम्। अहं खलु मधूकस्य ऋषेः शापो वज्रबाहुर्नाम।

श्मशानमध्यादहमागतोऽस्मि चण्डालवेषेण विरूपचण्डम्।
कपालमालातिविचित्रवेषः कंसस्य राज्ञो हृदयं प्रवेष्टुम् ॥५॥

कंसः– असम्भाव्यमर्थं प्रार्थयसि।

सौवर्णकान्ततरकन्दरकूटकुञ्जं
मेरुं न कम्पयति वायसपक्षवातः।
हास्योऽसि भोः! समकरक्षुभितोर्मिमालं
पातुं य इच्छसि कराञ्जलिना समुद्रम ॥६॥

शापः– काले ज्ञास्यसि।

राजा– हं, कथं सहसैव नष्टः। यावदहमपि शयनमुपगम्य नयनव्याक्षेपं करोमि। (स्वपिति।)

शापः- अये प्रसुप्तः। अलक्ष्मि! खलति! कालरात्रि! महानिद्रे! पिङ्गलाक्षि! तदागम्यतामभ्यन्तरं प्रविशामः।

सर्वाः- एवं भवतु।

(प्रविश्य)

राजश्रीः – न खलु प्रवेष्टव्यम्।

शापः– का भवती ।

श्रीः– किं मां न जानीषे । अहं खल्वस्य लक्ष्मीः ।

शापः– एवम् । राजश्रीः ! अपक्रामतु भवती । इदं खलु मम गृहं संवृत्तम् ।

श्रीः– हं,

लङ्कोपमं मम गृहं न विचिन्त्य मूढ ।
कस्याश्रयाद् विशसि मामवधूय रात्रौ ।
किं भाषितेन बहुना न च शक्यमेतद्
द्रष्टुं प्रवेष्टुमिह तेऽद्य मयाऽभिजुष्टम् ॥७॥

शापः-- भगवति पद्मालये ! अपक्रामतु किल कंसशरीरात् । विष्णु–राज्ञापयति ।

श्रीः-- कथं विष्णुराज्ञापयतीति ? भोः कष्टम् ।

न चाहं चिरसंवासात् त्यक्तुं शक्नोमि पार्थिवम्
बलवान् गुणसङ्ग्राहो दृढं तपति मामयम् ॥८॥

भवतु । अनतिक्रमणीया विष्णोराज्ञा । तस्मादहमपि विष्णुसकाशमेव यास्यामि । (निष्क्रान्ता ।)

शापः-- अपक्रान्ता राजश्रीः । हन्तेदानीमिदमस्माकमावासः संवृत्तः । अलक्ष्मि ! खलति ! कालरात्रि ! महानिद्रे ! पिङ्गलाक्षि ! अभ्यन्तरं प्रविश्य स्वजातिसदृशी क्रीडा क्रियताम् ।

सर्वाः-- अद्यप्रभृत्यपनीतधर्मचारित्रो भव ।

शापः--

परिष्वजामि गाढं त्वां नित्याधर्मपरायणम् ।
प्राप्नोमि मुनिशापस्त्वामचिरान्नाशमेष्यसि ॥९॥

( अन्तर्हितः । )

( प्रविश्य )

प्रतिहारी-- जयतु भर्ता ।

राजा-- हं !

